॥ श्रीः ॥

# सुलभ श्रीमद्भागवत

## नवम स्कंध

## अध्याय १ ला

परीक्षित्‌राजा म्हणाला,– हे शुकमुने, तुम्हीं जो सर्व मन्वंतरांचा वृत्तान्त सांगितला आणि त्यांतील श्रीहरीचीं जीं पराक्रमाचीं कृत्यें वर्णन केलीं तीं मीं ऐकिलीं ॥ १ ॥ द्रविड देशाचा सदाचारसंपन्न राजा जो सत्यव्रत त्यानें गेल्या कल्पाच्या शेवटीं परमेश्वराचीं सेवा करून ज्ञानप्राप्ति करून घेतली तो सूर्याचा पुत्र असून मनु झाला आणि त्याला इक्ष्वाकु आदिकरून दहापुत्र झाले, हेंही तुम्ही सांगितल्यावरून मला समजलें ॥ २ ॥ ३ ॥ आतां हे मुने, त्या पुत्रांचे निरनिराळे वंश आणि त्या वंशांतील पुरुषांचे पराक्रम हे तुम्ही सांगा. तें ऐकण्याची मला नित्य उत्कंठा असते ॥ ४ ॥ त्या वंशांत आजवर जे होऊन गेले, पुढें जे होणार असतील अथवा जे सांप्रत विद्यमान आहेत, त्या सर्व पवित्रकीर्ति पुरुषांचे पराक्रम तुम्ही सांगा ॥ ५ ॥

सूत म्हणतो,– हे शौनकऋषि हो, याप्रमाणें ब्रह्मादिमुनींच्या त्या मेळ्यांत परीक्षितानें विनंति केली असतां धर्मज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ अशा त्या शुकाचार्यानें उत्तर देण्यास आरंभ केला ॥ ६ ॥

शुकाचार्य म्हणाले,–हे राजा परीक्षिता, वैवस्वतमनूचा वंश मी तुला थोडक्यांत सांगतों तो ऐक. त्याचें वर्णन विस्तारानें जर करूं लागलों तर शंभर वर्षेंहि पुरणार नाहींत ॥ ७ ॥ लहानथोर अशा सर्व प्रकारच्या प्राणिमात्रांच्या अंतर्यामी जो परमेश्वर, तोच कल्पाच्या शेवटीं या विश्वांत एकटा राहिला होता. दुसरें कांहींहि नव्हतें ॥ ८ ॥ त्या समयीं त्या परमपुरुषाच्या नाभीपासून एक सुवर्णाचा कमलकोश उत्पन्न झाला आणि हे राजा, त्या कोशामध्यें चार मुखांचा ब्रह्मदेव निर्माण झाला ॥ ९ ॥ पुढें त्याला मरीचि नांवाचा मानसपुत्र झाला. मरीचीपासून कश्यपाची उत्पत्ति झाली आणि या कश्यपापासून दक्षकन्या अदितीच्या पोटीं विवस्वान् नांवाचा पुत्र झाला ॥ १० ॥ या विवस्वतापासून

संज्ञानामक त्याच्या पत्नीच्या पोटीं श्राद्धदेवमनु जन्मास आला व त्या आत्मज्ञानी मनूला श्रद्धा नांवाच्या स्त्रीपासून दहा पुत्र झाले ॥ ११ ॥ हे जे त्या प्रभावशाली मनूला पुत्र झाले यांचीं नांवें, इक्ष्वाकु, नृग, शर्याति, दिष्ट, करूषक, नरिष्यन्त, पृषध्र, नभग व कवि अशीं होतीं ॥ १२ ॥ मनूला प्रथम संतति नसल्यामुळें ती त्याला व्हावी म्हणून समर्थ अशा भगवान् वसिष्ठानें मित्रावरुणांना उद्देशून इष्टि केली ॥१३॥ त्या वेळीं मनूची पत्नी श्रद्धा प्रयोव्रत करीत होती, ती होत्यांकडे जाऊन त्याला नमस्कारपूर्वक म्हणाली, 'मला मुलगी पाहिजे' ॥ १४ ॥ नंतर इष्टि चालू होऊन अध्वर्यूनें सांगितल्याप्रमाणें होता आहुति देत असतां श्रद्धेनें सांगितलेलेंच त्याच्या लक्षांत राहिलें आणि त्यामुळें वषटकारपूर्वक हविर्भाग देत असतां त्यानें तिच्या सांगण्याप्रमाणें संकल्प केला ॥ ५॥ होत्याच्या या चुकीमुळें मनूला श्रद्धेपासून जें अपत्य झालें ती अर्थात् इला नांवाची कन्या झाली व तिला पाहून मनूला कांहीं बरें वाटलें नाहीं ॥१६॥ तों वसिष्ठाला म्हणाला,–' हे भगवन्, हा प्रकार काय आहे, तुम्हां ब्रह्मवाद्यांनीं केलेल्या इष्टीचें हें उलट फळ कसें मिळालें ? अरेरे, वेदमंत्राचें असें फळ मिळणें बरें नव्हे ॥ १७ ॥ तुम्ही वेदवेत्ते असून तपाच्या योगानें तुमचें पाप जळून गेलेलें आहे, म्हणूनच तुमची या इष्टीवर योजना केली. देवांमध्यें ज्याप्रमाणें असत्य आढळणार नाहीं, तसें तुमच्या संकल्पालाहि उलटी फलप्राप्ति होणें शक्य नाहीं ॥ १८ ॥ मनूचें हें भाषण ऐकून त्याचा पणजोबा जो भगवान् वसिष्ठ त्याला हा प्रकार होत्याच्या चुकीमुळें झाला असें आढळून आलें; आणि तो मनूला म्हणाला ॥ १९ ॥ ' हे मनो, हें जें संकल्पाच्या उलट फळ मिळालें त्याचें कारण होत्याची चूक हें होय, पण मीं आतां स्वतःच्या पराक्रमानें तुला पुत्रसंतति मिळवून देतों ॥ २० ॥ याप्रमाणें भगवान् वसिष्ठाचा निश्चय झाला असतां, त्या थोर कीर्तीच्या मुनीनें इलेला पुरुषत्व प्राप्त व्हावें या हेतूनें परमेश्वराची स्तुति केली ॥ २१ ॥ तेव्हां त्याच्यावर संतुष्ट होऊन भगवान् श्रीहरीनें त्याला पाहिजे होता तो वर दिला आणि त्यामुळें त्या इलेला श्रेष्ठ पुरुषाचें स्वरूप प्राप्त होऊन त्याचें नांव सुद्युम्न असें ठेवण्यांत आलें ॥ २२ ॥ हे राजा, हा सुद्युम्न एकदां मृगया करण्यासाठीं कित्येक अमात्यांना घेऊन अरण्यांत गेला. तो सिंधु देशांतील घोड्यावर आरूढ झाला होता ॥ २३ ॥ त्याच्या हातांत सुंदर धनुष्य आणि अत्यंत तीक्ष्ण असे बाण असून त्यानें अंगांत चिलखतहि घातलें होतें. त्या अरण्यांत फिरतां फिरतां एका हरिणाच्या मागें लागून तो वीर सुद्युम्न उत्तर दिशेकडे गेला ॥२४॥ मेरुच्या पायथ्याशीं गेल्यावर तो राजपुत्र तेथील वनांत शिरला. या वनांत भगवान् शंकर पार्वतीसह क्रीडा करीत असतो ॥ २५ ॥ प्रतापशाली सुद्युम्न त्या वनांत गेल्याबरोबर, आपलें रूप बदलून आपणांला स्त्रीत्व प्राप्त झालें आणि घोडाहि घोडी बनला आहे, असें त्याला दिसून आलें ॥ २६ ॥ त्याच्या अनुयायांमध्यें सुद्धां असाच लिंगविपर्यय घडून आला आणि तें पाहून ते सर्व एकमेकांकडे पाहत खेद करूं लागले ॥ २७ ॥ परीक्षित्-राजा म्हणतो,–हे शुकमुने, हा वनप्रदेश असा कां झाला व त्याला तसा कोणीं केलें हें मला कृपा करून सांग. तें ऐकण्याची मला उत्कंठा आहे ॥ २८ ॥ शुकाचार्यांनीं उत्तर

दिलें.—हे राजा, एकदां असें झालें कीं, कित्येक व्रतशाली ऋषि आपल्या तेजानें अंधकाराचा नाश करीत जेथें शंकरपार्वती क्रीडा करीत होतीं तेथें दर्शनासाठीं गेले ॥ २९ ॥ त्या वेळीं देवी पार्वती वस्त्ररहित असल्यामुळें त्यांना पाहून तिला लाज वाटली आणि पतीच्या मांडीवरून चमकून उठून तिनें वस्त्र परिधान केलें ॥ ३० ॥ ऋषिसुद्धां शंकर-पार्वतींची एकान्त क्रीडा चालली आहे असें जाणून तेथून परतले आणि नरनारायणाच्या आश्रमास गेले ॥ ३१ ॥ मग भगवान् शंकरानें पुन: अशी गोष्ट घडूं नये आणि आपल्या प्रिय पार्वतीची कामना पूर्ण व्हावी म्हणून असें ठरविलें कीं, जो कोणी पुरुष या स्थानांत प्रवेश करील त्याला स्त्रीत्व प्राप्त होईल ॥ ३२ ॥ शंकरानें असें ठरविल्यापासून कोणीहि पुरुष त्या स्थानाकडे जात नाहींसा झाला. असो. सुद्युम्नाला स्त्रीत्व प्राप्त झालें असतां ती स्त्री आपल्या अनुयायी स्त्रीगणासह त्या वनांतून इकडून तिकडे फिरूं लागली ॥ ३३ ॥ अशा स्थितींत त्या आश्रमाजवळच स्त्रियांसह ती फिरत असतां भगवान् बुधाच्या ती दृष्टीस पडली व त्याचें तिच्यावर प्रेमहि जडलें ॥ ३४ ॥ उलट त्या सुंदर स्त्रीचेंहि त्या सोमपुत्राला पाहतांच त्याच्यावर मन बसलें व तिनें त्याला पति म्हणून वरिलें. पुढें त्यांना पुरूरवा नांवाचा पुत्र झाला ॥ ३५ ॥ याप्रमाणें स्त्रीत्व प्राप्त झालें असतां त्या मनुपुत्र सुद्युम्न-राजाला आपल्या कुळाचा आचार्य जो वसिष्ठ त्याचें स्मरण झालें असें म्हणतात ॥ ३६॥ तो प्रकार पाहून वसिष्ठाला फार वाईट वाटलें आणि त्यानें सुद्युम्नाला पुन: पुरुषत्व मिळावें या हेतूनें शंकराची उपासना केली ॥ ३७ ॥ तेव्हां शंकर वसिष्ठावर संतुष्ट झाला आणि त्यांचें प्रिय व्हावें व आपलेंहि वचन खोटें होऊं नये अशा बुद्धीनें त्यानें वसिष्ठाला तडजोड सांगितली ॥ ३८ ॥ शंकर म्हणाला,—हे वसिष्ठा, तुझा हा वंशज सुद्युम्न एक महिना पुरुष होईल व एक महिना स्त्री होईल आणि अशा व्यवस्थेनें हा पृथ्वीचें राज्य करील ॥ ३९ ॥ आचार्य वसिष्ठाच्या कृपेनें इष्ट असें पुरुषत्व अशा व्यवस्थेनें प्राप्त झाल्यावर सुद्युम्नानें पृथ्वीचें राज्य केलें; परंतु प्रजेला त्यामुळें कांहीं बरें वाटलें नाहीं ॥ ४० ॥ हे राजा, सुद्युम्नाला उत्कल, गय आणि विमल असे जे तीन पुत्र झाले, ते मोठे धर्मिष्ठ असून दक्षिणदेशाचे अधिपति झाले ॥ ४१ ॥ पुढें प्रतिष्ठाननगरीचा राजा तो प्रभावशाली सुद्युम्न, वृद्धपण आलें असतां पुरूरव्याच्या स्वाधीन पृथ्वीचें राज्य करून तपश्चर्येसाठीं वनांत गेला ॥ ४२ ॥

**अध्याय पहिला समाप्त**

# अध्याय २ रा

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, सुद्युम्नपुत्रानें याप्रमाणें वनाचा आश्रय केला असतां वैवस्वतमनूनें पुत्रप्राप्तीसाठीं यमुनेच्या कांठीं शंभर वर्षे तपश्चर्या केली ॥ १ ॥ त्यानंतर त्यानें अपत्य व्हावें म्हणून भगवान् श्रीहरीचेंहि पूजन केलें व त्यामुळें त्याला इक्ष्वाकुप्रमुख दहा पुत्र झाले. हे सारे पुत्र त्याला अगदीं अनुरूप असेच होते ॥ २ ॥ त्यांपैकीं पृषध्र नांवाचा जो मनूचा पुत्र होता, त्याची योजना पित्यानें गाईचें रक्षण करण्याच्या कामावर केली व त्याप्रमाणें तो रात्रौ सावधपणें वीरासारखा शस्त्र धारण करून गाईचें रक्षण करी ॥ ३ ॥ एकदां असें झालें कीं, रात्रीं पाऊस पडत असतां एक वाघ त्या गाईच्या गोठ्यांत शिरला. त्याला पाहतांच विश्रांति घेत पडलेल्या गाई उठल्या आणि घाबरून गोठ्यांत पळूं लागल्या ॥ ४ ॥ पण त्या बळकट वाघानें एका गाईला पकडलें आणि म्हणून ती गांगरून ओरडूं लागली. तिचा हंबरडा ऐकतांच पृषध्र तिच्याजवळ गेला ॥ ५ ॥ पण रात्रीचा वेळ असून तान्यांचा प्रकाशहि ढगामुळें लुप्त झालेला असल्यामुळें न जाणतां त्यानें वाघ समजून त्या कपिलागाईचीच मान आपल्या तरवारीनें वेगानें उडविली ॥ ६ ॥ वाघालाहि तरवारीच्या टोकाचा वार लागून त्याचा कान तुटून पडला व त्यामुळें तोहि अगदीं भयभीत होऊन वाटेंत रक्त सांडीत पळून गेला ॥ ७ ॥ पराक्रमी पृषध्राला आपण वाघाचा वध केला असें वाटलें; पण पहांट झाल्यावर आपल्या हातून कपिलागायच मरण पावली असें त्याला आढळलें आणि तो फार कष्टी झाला ॥ ८ ॥ त्याच्या हातून हा अपराध न कळतां झाला होता, तथापि कुलगुरु वसिष्ठानें त्याला शाप दिला कीं, तूं या कर्मामुळें क्षुद्र असा सुद्धां क्षत्रिय न होतां शूद्र होशील ॥ ९ ॥ गुरूनें याप्रमाणें शाप दिला असतां पृषध्रानें नमस्कारपूर्वक त्याचा स्वीकार केला आणि ब्रह्मचर्य पाळून मुनींना प्रिय असें व्रत धारण केलें ॥१०॥ सर्वांचा अन्तर्यामी, सर्वश्रेष्ठ व पवित्र अशा भगवान् वासुदेवावर त्यानें निष्ठा ठेविली आणि त्याची भक्ति करून तो सर्वांचा मित्र व सर्वांवर सारख्या दृष्टीनें पाहणारा झाला ॥ ११ ॥ त्यानें सर्व उपभोग्य विषयांचा त्याग केला, मन स्वस्थ केलें, इंद्रियांचें नियंत्रण केलें आणि जवळ कसलाहि संग्रह न करतां जें कांहीं सहजगत्या मिळेल त्याच्यावर तो निर्वाह करूं लागला ॥ १२ ॥ परमात्म्यावर चित्त लाविल्यामुळें तो पूर्ण समाधानी बनला आणि ज्ञानानेंच तृप्त होऊन वेड्याप्रमाणें किंवा आंधळ्याबहिन्याप्रमाणें पृथ्वीवर भटकूं लागला ॥ १३ ॥ या वृत्तीनें तो राहात असतां एकदां तो वनांत गेला आणि तेथें वणवा पेटलेला पाहून त्यांत त्यानें प्रवेश केला. देह अग्नीच्या उपयोगाला लागल्यामुळें मुनिवृत्ति धारण करणाऱ्या त्या पृषध्राला परब्रह्माची प्राप्ति झाली ॥ १४ ॥ मनूचा कनिष्ठ पुत्र कवि हा विषयभोगाविषयीं निरिच्छ असल्यामुळें त्यानें आपल्या बांधवांचा व राज्याचाहि त्याग केला आणि बालवयांत असतांनाच आपल्या चित्तांत स्वयंप्रकाश परमात्म्याची स्थापना

करून तो मोक्षाला गेला ॥ १५ ॥ मनूच्या करूपनामक पुत्रापासून पुढें कारूष नांवाचा क्षत्रियवंश झाला. या वंशातील पुरुष ब्राह्मणांचे वाली आणि धर्मावर प्रेम करणारे असून त्यांनी उत्तरेकडील प्रदेशावर राज्य केलें ॥ १६ ॥ मनूच्या धृष्टनामक पुत्रापासून धार्ष्ट हें क्षत्रिय घराणें स्थापन झालें; पण तें बहुधा ब्राह्मणवृत्तीनेंच राहात असे. नृग नांवाचा जो मनूचा पुत्र होता त्याचा सुमति नांवाचा पुत्र असून सुमतीचा पुत्र वसु नांवाचा झाला ॥ १७ ॥ वसूला प्रतीक हा पुत्र झाला आणि प्रतीकाला ओघवान् नांवाचा पुत्र व ओघवती नांवाची कन्या अशीं अपत्यें झालीं. ओघवानाला ओघवत् हा पुत्र झाला आणि ओघवतीचें सुदर्शनानें पाणिग्रहण केलें ॥ १८ ॥ मनूच्या नरिष्यन्त या पुत्रापासून चित्रसेनाचा जन्म झाला आणि चित्रसेनाला दक्षनामक मुलगा झाला. दक्षाचा मुलगा मीढ्वबा, मीढ्वबाचा कूर्च आणि कूर्चाचा इंद्रसेन होय ॥ १९ ॥ इन्द्रसेनाचा पुत्र वीतिहोत्र आणि त्याचा सत्यश्रवा. सत्यश्रव्याचा पुत्र उरुश्रवा आणि उरुश्रव्याचा देवदत्त ॥ २० ॥ देवदत्ताच्या पोटीं प्रत्यक्ष भगवान् अग्निनारायण पुत्ररूपानें अवतरला. त्याचें नांव अग्निवेश्य. तो जतूकर्णीचा पुत्र असून तिला तो कन्यावस्थेंत झाला होता. पुढें तो मोठा ऋषि म्हणून प्रसिद्धीस आला ॥ २१ ॥ हे राजा, या अग्निवेश्यापासून अग्निवेश्यायन नांवाचें ब्राह्मणघराणें स्थापन झालें. असा हा नरिष्यन्ताचा वंश आहे. आतां दिष्टाचा वंश सांगतों तो ऐक ॥ २२ ॥ दिष्टाला नाभाग नांवाचा पुत्र होता. नभागाचा पुत्र जो नाभाग तो हा नव्हे. हा नाभाग आपल्या कर्माला अनुसरून वैश्य झाला. नाभागाला भलंदन नांवाचा पुत्र असून भलंदनाचा पुत्र वत्सप्रीति नांवाचा होता ॥ २३ ॥ वत्सप्रीतीला प्रांशु हा मुलगा झाला. प्रांशूच्या पुत्राला प्रमति म्हणत. प्रमतीला खनित्र नांवाचा पुत्र झाला. खनित्राला चाक्षुष झाला आणि चाक्षुषाला पुढें विविंशतिनामक पुत्र झाला ॥ २४ ॥ विविंशतीचा पुत्र खनिनेत्र आणि खनिनेत्राचा रंभ. हा रंभ मोठा धर्मिष्ठ होता. हे राजा, या रंभाला करंधम नांवाचा पुत्र झाला ॥ २५ ॥ करंधमाचा पुत्र आवीक्षित् नांवाचा होता. त्याचा पुत्र महायोगी संवर्त. यानें या मरुत्ताकडून यज्ञ करविला असें म्हणतात ॥ २६ ॥ मरुत्ताचा हा यज्ञ जसा झाला, तसा दुसऱ्या कोणाचाहि कधीं झाला नाहीं. त्याच्या यज्ञामध्यें ज्या कांहीं लहानमोठ्या वस्तु होत्या त्या सर्व सोन्याच्या असून सर्व सुंदर होत्या ॥ २७ ॥ त्या यज्ञामध्यें इंद्राला इतका कांहीं सोमरस प्यावयास मिळाला कीं, त्यानें तो धुंद होऊन गेला आणि ब्राह्मणांनाहि तशीच दक्षिणा मिळाल्यामुळें तेहि धुंद होऊन गेले. या यज्ञामध्यें मरुत् नांवाच्या देवगणांनीं वाढप्यांचें काम केलें आणि विश्वेदेव नांवाचे देवगण सभासद होते ॥ २८ ॥ असो. मरुत्ताचा पुत्र दम नांवाचा असून दमाचा राज्यवर्धन होय. राज्यवर्धनाला सुधृति हा पुत्र होता आणि सुधृतीला पुढें नर नांवाचा पुत्र झाला ॥ २९ ॥ नराचा पुत्र केवल, केवलाचा बन्धुमान् आणि बन्धुमानाचा वेगवान् होय. वेगवानाला बन्धुनामक पुत्र झाला आणि या बंधूचा जो पुत्र तो तृणबिन्दु नांवाचा राजा होय ॥ ३० ॥ तृणबिन्दूच्या

अंगीं असे गुण होते कीं, पुष्कळांनीं त्याच्या भजनीं लागावें. त्याप्रमाणें अलंबूषा नांवाची एक सुंदर अप्सरा त्याच्या भजनीं लागली आणि त्याच्यापासून तिला अनेक पुत्र आणि इडविडा नांवाची कन्या अशीं अपत्यें झालीं. या इडविडेपासून विश्रवा ऋषीला कुबेर हा पुत्र झाला. या विश्रव्यानें योगांत निष्णात अशा आपल्या पित्यापासून उत्तम प्रकारची विद्या संपादन केली होती ॥ ३१ ॥ ३२ ॥ असो. विशाल, शून्यबंधु आणि धूम्रकेतु हे तृणबिन्दूचे पुत्र होत. त्यांपैकीं विशालापासून वंशोत्पत्ति होऊन त्यानें वैशालीनामक नगरीची स्थापना केली ॥ ३३ ॥ या विशालाचा पुत्र हेमचंद्र आणि हेमचंद्राचा धूम्राक्ष असे असून धूम्राक्षाच्या संयमनामक पुत्राला कृशाश्व आणि देवज असे पुत्र झाले ॥ ३४ ॥ कृशाश्वाला सोमदत्त हा पुत्र झाला. या सोमदत्तानें भगवान् यज्ञपतीचें अश्वमेधानें पूजन केलें व योगेश्वर परमात्म्याचा आश्रय करून मोक्षनामक सर्वश्रेष्ठ पदवी प्राप्त करून घेतली ॥ ३५ ॥ सोमदत्ताला सुमतिनामक पुत्र झाला. या सुमतीचाच पुत्र जनमेजय होय. हे सारे विशालाच्या वंशांतील राजे असून त्यांनीं तृणबिंदूच्या कीर्तीचें रक्षण केलें ॥ ३६ ॥

**अध्याय दुसरा समाप्त**

---

# अध्याय ३ रा

शुक्राचार्य म्हणाले,—मनूचा पुत्र शर्याति हा राजा असून वेदांतील तत्त्वार्थाचा सर्वोत्तम ज्ञाता होता. अंगिराऋषीच्या सत्रांतील दुसऱ्या दिवशींचें सर्व कृत्य यानेंच स्वतः सांगितलें ॥ १ ॥ त्याला सुकन्यानामक एक सुस्वरूप मुलगी होती. एकदां सुकन्येला बरोबर घेऊन शर्यातिराजा वनशोभा पाहण्यासाठीं गेला असतां च्यवनऋषींच्या आश्रमापाशीं आला ॥ २ ॥ तेथें सुकन्या आपल्या मैत्रिणींबरोबर झाडांची शोभा पाहत इकडेतिकडे हिंडत असतां एका वारुळाच्या भोंकांतून काजव्याप्रमाणें चमकणाऱ्या दोन ज्योति तिच्या दृष्टीस पडल्या ॥ ३ ॥ अज्ञानीच ती ! तें काय आहे हें पाण्याच्या हेतूनें तिनें एक कांटा घेऊन त्या चकचकणाऱ्या पदार्थांना टोंचिलें, तों त्यांतून भळभळां रक्त वाहूं लागलें ॥ ४ ॥ हे राजा, इकडे हा प्रकार होतांच राजाच्या सैन्यांतील लोकांचें मळमूत्र बंद झालें. तें पाहून राजाला मोठें आश्चर्य वाटलें आणि तो सैनिकांना म्हणाला,—" अहो, तुम्हीं कोणीं च्यवनभार्गवऋषींचा अपराध केला नाहीं ना ? मला तर खचित वाटतें, कांहीं तरी अनिष्ट प्रकार या आश्रमांत कोणीं केला असला पाहिजे " ॥ ५ ॥ ६ ॥ तें ऐकून सुकन्येला भीति वाटली आणि ती पित्याला म्हणाली, माझ्याच हातून हा अपराध झाला आहे. मी न जाणतां दोन चकचकणाऱ्या ज्योतींना कांट्यानें टोंचिलें ॥ ७ ॥ मुलीचें तें भाषण ऐकून शर्यातीच्या मनाला फार खेद झाला आणि वारुळांत झांकून गेलेल्या त्या च्यवनमुनीपाशीं जाऊन सौम्य व मधुर शब्दांनीं त्यानें त्याला प्रसन्न केलें ॥ ८ ॥ त्या वेळीं झालेल्या भाषणावरून राजानें मुनीचा आशय जाणला व तदनुसार आपली कन्या त्याला अर्पण केली. याप्रमाणें संकटांतून मुक्त झाल्यावर शर्याती च्यवनाची अनुज्ञा घेऊन स्वस्थ मनानें आपल्या राजधानीला गेला ॥ ९ ॥ च्यवनऋषि मोठा कोपिष्ट होता; परंतु त्याला पति म्हणून वरिल्यावर त्याच्या इच्छेप्रमाणें बिनचूक वागून सुकन्येनें त्याचें मन अगदीं संतुष्ट ठेविलें ॥ १० ॥ पुढें कांहीं काळ लोटल्यावर एकदां अश्विनीकुमार च्यवनाच्या आश्रमांत आले असतां च्यवनऋषीनें त्यांची यथायोग्य पूजा करून त्यांना विनंति केली. तो म्हणाला,—हे देव हो, तुम्ही मोठे समर्थ वैद्य आहां, तरी स्त्रियांना प्रिय असलेलें तारुण्य व सुंदर रूप तुम्ही मला प्राप्त करून द्या. ह्याबद्दल तुम्हांला यज्ञांत सोमप्राशन करावयाचा जो अधिकार नाहीं तो मी मिळवून देईन ॥ ११ ॥ १२ ॥ नंतर बरें आहे, असें म्हणून अश्विनीकुमार त्याला म्हणाले,—हे मुने, सिद्धांनीं निर्माण केलेल्या या जवळच्या डोहामध्यें बुडी मारा, म्हणजे तुमची इच्छा पूर्ण होईल ॥ १३ ॥ असें सांगून अश्विनीकुमारांनीं, जरेनें अगदीं ग्रासून गेल्यामुळें शिरांनीं व्यापिलेल्या व सर्वांगावर सुरकुत्या पडून पिकलेल्या केसांमुळें कुरूप दिसणाऱ्या त्या च्यवनऋषीला धरून, त्याच्यासह त्या डोहांत बुडी

मारिली ॥ १४ ॥ थोड्या वेळानें डोहांतून तीन सुंदर पुरुष वर आले. त्यांचीं रूपें एकसारखीं असून स्त्रियांना प्रिय वाटणारीं होतीं. त्यांनीं गळ्यांत कमळांच्या माळा आणि कानांत कुंडलें धारण केलीं असून उंची उंची वस्त्रें परिधान केलीं होतीं ॥ १५ ॥ तेव्हां सूर्यासारखें तेज:पुंज असे ते तीन पुरुष पाहून त्यांतील आपला पति कोणता हें त्या साध्वी सुकन्येला मुळींच ओळखतां आलें नाहीं आणि म्हणून अश्विनीकुमारांनाच शरण जाऊन त्यांची तिनें प्रार्थना केली. तेव्हां तिच्या पातिव्रत्यानें संतुष्ट होऊन त्यांनीं तिचा पति तिला दाखविला आणि च्यवनाचा निरोप घेऊन ते विमानांत बसून स्वर्गलोकीं निघून गेले ॥ १६ ॥ १७ ॥ पुढें एकदां असें झालें कीं, यज्ञ करण्याचा विचार ठरवून शर्यातिराजा च्यवनाश्रमांत आला आणि पाहातो तों आपल्या कन्येजवळ कोणी सूर्यासारखा तेजस्वी पुरुष बसलेला आहे ! ॥ १८ ॥ तें पाहून, त्याच्या मनाला कांहीं बरें वाटलें नाहीं आणि सुकन्येनें नमस्कार केला असतां तिला आशीर्वादहि न देतां तो म्हणाला,–" कार्टे, हें तूं आरंभिलें आहेस तरी काय ? पति म्हणून वरिलेल्या त्या सर्वमान्य च्यवनऋषींना तूं फसविलेंस ना ? वार्धक्यानें पीडिलेल्या त्या मुनीला सोडून तूं या जाराच्या भजनीं लागलीस काय ? तुझा जन्म उत्तम कुळांत झाला असतांहि विपरीत बुद्धि तुला कशी सुचली ? निर्लज्ज होऊन तूं या जाराचा आश्रय केलास हें तुझें कृत्य कुळाला बट्टा लावणारें असून त्यामुळें तूं माझें व आपल्या पतीचें कुळ नरकांत ढकलीत आहेस ! " ॥ १९ ॥ २० ॥ २१ ॥ पित्याचे हे उद्गार ऐकतांच त्या पवित्र सुकन्येला आश्चर्यानें हंसूं आलें आणि ती म्हणाली,– " बाबा, तुम्ही ही काय शंका घेतां ? हे आपले जांवई च्यवनऋषीच आहेत ' ॥२२॥ असें म्हणून आपल्या पतीला तारुण्य व सुस्वरूप हीं कशीं प्राप्त झालीं याचा सविस्तर वृत्तान्त तिनें त्याला सांगितला. तो चमत्कारिक वृत्तान्त ऐकून राजाला मोठें आश्चर्य वाटलें व आनंदित होऊन त्यानें मोठ्या प्रेमानें आपल्या कन्येला आलिंगन दिलें ॥ २३ ॥ असो. नंतर च्यवनभार्गवऋषीनें शर्यातिराजाकडून सोमयाग करविला आणि त्यांत पूर्वी ठराव केल्याप्रमाणें सोमपानाचा अधिकार नसलेल्या अश्विनीकुमारांना आपल्या सामर्थ्यानें सोमरसाची प्राप्ति करून दिली ॥ २४ ॥ पण त्यामुळें च्यवनमुनीवर इंद्र रागावला आणि त्याला मारण्यासाठीं त्यानें वज्र उचलिलें. तथापि च्यवनानें स्वसामर्थ्यानें वज्रासह इंद्राचा हातच कुंठित केला आणि मग सर्वांनीं अश्विनीकुमारांना यज्ञांत सोमाचा भाग देण्यास अनुमति दिली. तोंपर्यंत अश्विनीकुमार हे वैद्य असल्यामुळें त्यांना यज्ञांत सोमाचा भाग मिळत नव्हता ॥ २५ ॥ २६ ॥ शर्यातीला या कन्येखेरीज उत्तानबर्हि, आनर्त आणि भूरिषेण असे तीन पुत्र होते. त्यांतील आनर्ताला रेवतनामक पुत्र झाला ॥ २७ ॥ त्यानें समुद्रांत कुशस्थली नांवाची नगरी बांधिली व तेथेंच राहून तो आनर्तादि देशांचा राज्यकारभार चालवूं लागला ॥ २८ ॥ त्याला शंभर पुत्र झाले. त्यां सर्वांत ककुद्मी हा वडील होता. त्याला रेवती नांवाची मुलगी होती. ती उपवर झाली असतां तिला पति कोण योजावा हें ब्रह्मदेवालाच विचारावें असें मनांत आणून कन्येला बरोबर घेऊन तो ब्रह्मलोकीं गेला.

त्या वेळीं तेथें गायन चाललें असल्यामुळें ब्रह्मदेवाला प्रश्न करण्यास त्याला अवसर मिळेना, म्हणून तो क्षणभर स्वस्थ बसला ॥ २९ ॥ ३० ॥ गायन संपल्यावर त्यानें ब्रह्मदेवाला आपला अभिप्राय कळविला. तो ऐकून ब्रह्मदेव हंसून त्याला म्हणाला, हे ककुद्मे, मीं जे वर मनांत योजिले होते ते सर्व कालगतीनें नाश पावले आहेत व त्यांचे मुलगे, नातू, पणतू यांच्याहि नांवांची वार्ता आतां ऐकूं येत नाहीं. कारण, तूं येथें यावयास निघाल्यापासून चार युगांच्या सत्तावीस फेऱ्या इतका काळ झाला ॥ ३१ ॥ ३२ ॥ यासाठीं आतां तूं परत जा आणि सध्यां पृथ्वीवर परमेश्वराचा अंशावतार असा महाबलशाली बलराम विद्यमान आहे, त्या नरश्रेष्ठाला आपली श्रेष्ठ कन्या अर्पण कर ! ॥ ३३ ॥ भूभार हरण करण्यासाठीं तो पवित्र कीर्ति भूतपालक भगवान् स्वतःच्या अंशानें अवतरला आहे ॥३४॥ अशी आज्ञा मिळतांच ककुद्मीराजा ब्रह्मदेवाला नमस्कार करून कन्येसह आपल्या राजधानीस आला ॥ ३५ ॥ त्याचे भाऊ ती नगरी यक्षांच्या त्रासानें सोडून दूर गेले होते. तें पाहून त्यानें आपल्या त्या सुंदर कन्येचा बलशाली बलरामाशीं विवाह करून दिला व आपण बदरिवनांतील नारायणाश्रमांत तपश्चर्या करितां निघून गेला ॥ ३६ ॥

**॥ तिसरा अध्याय समाप्त ॥**

# अध्याय ४ था

शुकाचार्य म्हणाले,– हे परीक्षितराजा, नभगाला नाभागनामक एक पुत्र होता. तो ब्रह्मचर्य स्वीकारून विद्यार्जनासाठीं गुरुगृहीं राहिला असतां त्याच्या भावांनीं सर्व संपत्ति आपसांत वांटून घेतली. पुढें विद्याभ्यास आटपून घरीं आल्यावर तो आपला वांटा मागूं लागला असतां भावांनीं सांगितलें कीं, तुझ्या बांटणीचे ' बाबा 'आम्हीं तुला राखून ठेविले आहेत. नंतर तो सरळ हृदयाचा नाभाग बापाकडे गेला व त्याला म्हणाला, तुम्हांला माझ्या बांटणीस दिलेलें आहे. तेव्हां नभगानें त्याला सांगितलें; हे बाळा, तें त्यांनीं तुला उगाच सांगितलें असेल. त्यावर तूं विश्वास ठेवूं नकोस. कारण, द्रव्याप्रमाणें माझा तुला उपयोग होणार नाहीं. त्यांतून तें जर खरेंच असेल तर तुझ्या निर्वाहाचें एक साधन मी सांगून ठेवतों ॥ १ ॥ २ ॥ बाळा, तूं शहाणा आहेस. हल्लीं आंगिरसऋषि द्वादेशाहनामक सत्र करीत बसले आहेत. ते चांगले विद्वान् असले, तरी षडहांच्या आवृत्तीच्या वेळीं ते घोंटाळ्यांत पडतात ॥ ३ ॥ तूं सुज्ञ आहेस, याकरितां त्यांना ' इदमित्था ' व ' ये यज्ञेन ' हीं विश्वेदेवांचीं दोन सूक्तें सांग म्हणजे कर्म समाप्त झाल्यावर स्वर्गास जातांना यज्ञांतील शिल्लक राहिलेलें सर्व द्रव्य ते तुला देतील. पित्याच्या ह्या आज्ञेप्रमाणें नाभाग तिकडे गेला व अंगिरसऋषींना त्यानें तीं दोन सूक्तें शिकविलीं. तेव्हां यज्ञ संपविल्यावर राहिलेलें सर्व द्रव्य ह्याला घेण्यास सांगून ते स्वर्गास गेले ॥ ४ ॥ ५ ॥ तें द्रव्य तो घेत असतां कोणी एक काळाभोर पुरुष उत्तरेच्या बाजूनें तेथें आला आणि यज्ञभूमीवर राहिलेलें द्रव्य माझें आहे असें म्हणाला ॥६॥ परंतु मला तर हें ऋषींनीं दिलें आहे. असें नाभागानें सांगितलें. राजा, तेव्हां तो कृष्णवर्ण पुरुष म्हणाला, हा वाद आपणां उभयतांमध्यें मिटणें शक्य नाहीं. यासाठीं, तूंच आपल्या बापाकडे जा आणि त्याला विचार कीं, यज्ञांतील द्रव्य ऋषींनीं मला घ्यावयास सांगितलें खरें; पण त्यावर रुद्र आपला हक्क सांगत आहे, तर कसें करूं ? मग तो जें सांगेल तें मला मान्य आहे ॥ ७ ॥ त्याप्रमाणें नाभागानें पित्याकडे जाऊन त्याला सर्व वृत्तात सांगितला. तेव्हां तो नभगराजा म्हणाला, हे बाळा, रुद्र म्हणतो ती गोष्ट खरी आहे. पूर्वीं दक्षाच्या यज्ञांत सर्वानुमतें असें ठरलें आहे कीं, यज्ञमंडपांतील उरलेल्या सर्व द्रव्यावर रुद्राचा हक्क असावा. शिवाय दुसरें असें कीं, अवशिष्ट द्रव्यावरचसें काय, पण सर्वच पदार्थांवर रुद्राचें स्वामित्व आहे ॥ ८ ॥ राजा, याप्रमाणें पित्याचें वचन ऐकून नाभागानें त्याला वंदन केलें आणि परत घेऊन त्यानें रुद्राला सांगितलें; ' हें द्रव्य तुझें आहे, तें तूं घे आणि मजकडून झालेल्या अपराधाची क्षमा कर ' ॥ ९ ॥ तेव्हां रुद्र म्हणाला,–हे नाभागा, तुझ्या पित्यानें ज्या अर्थीं खरा न्याय दिला आणि त्याप्रमाणें तूंहि

बागण्यास तयार झालास, त्या अर्थीं तुझ्या खरेपणाबद्दल प्रसन्न होऊन मीं हें सर्व द्रव्य तुला देतों. तुला मंत्रज्ञान आहेच व मी आणखी तुला ब्रह्मज्ञान देतों. असें सांगून भगवान् रुद्र अंतर्धान पावला ॥ १० ॥ ११ ॥ हे राजा, नाभागाचें हें आख्यान अत्यंत कल्याणप्रद आहे. जो याचें सकाळसंध्याकाळ पठण करील, त्याला भगवान् रुद्र प्रसन्न होऊन मंत्रज्ञान व ब्रह्मज्ञान देईल ॥ १२ ॥ हे राजा, या नाभागाला अंबरीष नांवाचा महाभगवद्भक्त पुत्र झाला. त्याची योग्यता फार मोठी होती. ब्राह्मणांचा शाप कधींहि अन्यथा व्हावयाचा नाहीं, पण तो याला शिवलादेखील नाहीं ॥ १३ ॥

परीक्षितूराजा म्हणाला,—हे मुनिवर्या, ब्राह्मणांच्या शापाचें निवारण ब्रह्मदेवालाहि करतां येत नाहीं; असें असतां त्याची शक्ति या अंबरीषावर चालली नाहीं, तेव्हां त्याचें चरित्र श्रवण करण्याची मला इच्छा आहे. यास्तव तें अद्भुत चरित्र आपण मला सांगा ॥ १४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, अंबरीषराजा हा महाभाग्यशाली व ज्ञानसंपन्न होता. जें ऐश्वर्य मनुष्यांना स्वप्नांत देखील दुर्लभ, असे सर्वोत्कृष्ट राज्यादि वैभव त्याला प्राप्त झालें असतां, तो त्याला तुच्छ मानीत असें. तो, समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा होता; पण हें वैभव अशाश्वत आहे असें जाणून त्यानें अखिल राज्यवैभव अगदीं मातीच्या ढेंकळासारखें मानलें होतें व त्याची परमेश्वरावर अत्यंत दृढ भक्ति होती ॥ १५ ॥ ॥ १६ ॥ १७ ॥ त्यानें आपलें मन श्रीकृष्णचरणाच्या चिंतनाकडे, वाणी भगवंताच्या गुणवर्णनाकडे, हस्त ईश्वराच्या पूजादिसेवेकडे, कान संसारनिवर्तक कथाश्रवणाकडे, डोळे परमेश्वराच्या मूर्ति पाहण्याकडे, शरीर भगवद्भक्तांना आलिंगन देण्याकडे, नाक श्रीकृष्णाच्या निर्माल्याचा सुगंध घेण्याकडे, जीभ भगवंताचा प्रसाद भक्षण करण्याकडे, पाय तीर्थाटनाकडे आणि मस्तक परमेश्वराच्या आणि त्याच्या भक्तांच्या चरणकमलांना वंदन करण्याकडे लाविलें होतें ॥ १८ ॥ १९ ॥ २० ॥ कोणतेंहि कर्म करितांना तो तें ईश्वरार्पणबुद्धीनें करी. सर्वाठायीं परमेश्वर भरला आहे अशी भावना ठेवून व ब्राह्मणांची आज्ञा तीच ईश्वराची आज्ञा आहे असें मानून, तो पृथ्वीचा राज्यकारभार चालवीत असे ॥ २१ ॥ राजा, त्या अंबरीषराजानें वसिष्ठ, गौतम इत्यादि मोठमोठ्या विद्वान् ब्राह्मणांकडून मारवाडदेशांतील सरस्वतीच्या उगमाकडे मुख करून अनेक अश्वमेध केले ॥ २२ ॥ त्या यज्ञांमध्यें सभासद, ऋत्विज्, प्रेक्षक आणि हविर्भाग घेणारे देव हे सारे अगदीं एकसारखे दिसत; कारण सर्वांचेच वस्त्रालंकार एकसारखे होते. आतां देवांच्या पापण्या हालत नसतात म्हणून त्यांचे डोळे तरी निराळे दिसावे कीं नाहीं पण तो अपूर्व समारंभ इतरहि एकसारखे टक लावून पाहत असल्यामुळें त्यांच्या नेत्रांतहि मुळींच फरक दिसत नव्हता ॥ २३ ॥ अशा प्रकारचा तो वैभवशाली अंबरीषराजा वैभवाविषयीं किती निरिच्छ होता याची कल्पना त्याच्या प्रजाजनांच्या वृत्तीवरून सहज होईल. स्वर्ग हें जें देवांचें स्थान तो अगदीं सर्वांना हवासा असावयाचा; पण हे राजा, याच्या राज्यांतील लोकांना स्वतःच्या हृदयांत नित्य मुकुंदाचें दर्शन घडत असल्यामुळें स्वर्गाचीहि मातब्बरी नव्हती ॥ २४ ॥ २५ ॥ शेवटीं त्या

राजर्षीनें सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्येनें परमेश्वराला संतुष्टकेलें. घर, दार, पुत्र, बांधव, हत्ती, रथ, घोडे, पायदळ, रत्नजडित अंलकार, आयुधें व भांडार या सर्वांविषयीं त्याची खोटेपणाची भावना झाली. तेव्हां प्रसन्न झालेल्या भगवंतानें त्याला सद्भक्तांचें रक्षण व दुर्जनांचा नाश करणारें असें आपलें सुदर्शनचक्र दिलें ॥ २६ ॥ ॥ २७ ॥ ॥ २८ ॥ ॥ २९ ॥ हे राजा, ह्या राजानें एकदां ईश्वराच्या आराधनेसाठीं आपल्या सुशील स्त्रीसह एक वर्षपर्यंत साधनद्वादशींचें व्रत केलें. त्या व्रताच्या समाप्तीच्या वेळीं त्यानें कार्तिक शुद्ध दशमीपासून द्वादशीपर्यंत त्रिरात्र उपोषण करून व यमुनेमध्यें स्नान करून मधुवनांत श्रीहरीला महाभिषेक केला आणि गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादि षोडशोपचारांनीं त्याचें यथाविधि पूजन केलें. त्याचप्रमाणें अत्यंत निःस्पृह अशा भगवद्भक्त ब्राह्मणांचेंहि त्यानें पूजन करून त्यांचा योग्य सत्कार केला ॥ ३० ॥ ३१ ॥ नंतर विद्वान् आणि सदाचारा संपन्न अशा ब्राह्मणांना षड्रसयुक्त अन्नाचें भोजन घालून त्यानें त्यांच्या इच्छेप्रमाणें दक्षिणा दिली आणि प्रत्येकाच्या घरीं त्यानें एकेक गाय पोहोंचती केली. राजा, त्या गाई वयानें लहान, सुंदर, स्वभावानें गरीब व सवत्स असून पुष्कळ दूध देणाऱ्या होत्या. त्यांचीं शिंगें सुवर्णानें मढविलीं असून खुरांवर चांदीचा पत्रा बसविला होता व पाठीवर मूल्यवान् भरजरी झुली घातल्या होत्या. हे राजा, अशा प्रकारच्या साठ कोटी गाई त्यानें ब्राह्मणांस दिल्या ॥ ३२ ॥ ३३ ॥ ३४ ॥ पुढें त्या संतुष्ट झालेल्या ब्राह्मणांची अनुज्ञा घे ऊन तो पारणा करणार, इतक्यांत दुर्वासमुनि त्याजकडे आला ॥ ३५ ॥ राजानें त्याला उच्चासनावर बसवून अर्ध्यपाद्यादिकांनीं त्याचा सत्कार केला व त्याच्या चरणीं मस्तक ठेवून ' येथेंच भोजन करावें ' अशी त्यांना प्रार्थना केली ॥ ३६ ॥ दुर्वासमुनीनें त्याची विनंति मान्य केली आणि माध्याह्नकृत्य आटोपण्यासाठीं तो कालिंदीच्या तीरावर गेला व स्नानविधि आटोपून गायत्रीचें ध्यान करीत बसला ॥ ३७ ॥ इकडे द्वादशी एक घटकाच शिल्लक राहिली, तरी दुर्वासमुनि आला नाहीं, असें पाहून अंबरीष मोठ्या संकटांत पडला ॥ ३८ ॥ द्वादशी असतांना पारणा केली नाहीं तर व्रतभंग होणार आणि पारणा केल्यास ब्राह्मणाला बोलावून त्याच्या आधीं भोजन केल्यामुळें त्याचा उपमर्द केल्याचा दोष लागणार, तेव्हां त्याला काय उपाय योजावा याबद्दल यानें ब्राह्मणांचें मत घेतलें आणि त्यांच्या विचारें असें ठरविलें कीं उदक प्राशन केल्यानें कांहीं खाल्ल्यासारखेंहि होतें,व उपोषणहि होतें असें ज्या अर्थी वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं सांगितलें आहे,त्या अर्थी उदक प्राशन करून पारणा करावी ॥ ३९ ॥ ४० ॥ याप्रमाणें निश्चय करून मनामध्यें भगवच्चिंतन करणारा तो राजर्षि उदक प्राशन करून दुर्वासाच्या आगमनाची वाट पाहात बसला ॥ ४१ ॥ नंतर थोड्याच वेळानें दुर्वासऋषि कालिंदीच्या तीरावरून नित्यकर्म आटोपून घरीं आला. त्या वेळीं राजानें त्याचें स्वागत केलें; पण राजानें पारणा केली हें ऋषीला अंतर्ज्ञानानें समजलेंच होतें ॥ ४२ ॥ हे राजा, आधींच तो कोपिष्ठ ब्राह्मण, तशांत त्याला भूक लागलेली, मग काय विचारतां ! क्रोधानें लाल होऊन त्याचें अंग थरथर कांपूं लागलें. अशा स्थितींत तो राजाला म्हणाला, " अहो, हा मदांध राजा किती उन्मत्त आहे पाहा ! अतिथि

म्हणून यानें मला आदरानें निमंत्रण केलें आणि आतां मला भोजन घालण्यापूर्वीच आपण जेवून बसला. तेव्हां यानें धर्माचा केवढा उपमर्द केला ! हा आपल्याला मोठा विष्णुभक्त म्हणवितो आणि ब्राह्मणांचा अपमान करतो. या निंद्य कृत्याचें फळ मी याला आतांच देतों ॥ ४३ ॥ ४४ ॥ ॥ ४५ ॥ इतकें बोलून त्या महातापसी ब्राह्मणानें आपल्या जटेंतील एक बट उपटली आणि तिच्यापसून प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें प्रखर अशी एक कृत्या निर्माण करून ती राजावर सोडिली ॥ ४६ ॥ तत्काल ती धगधगीत कृत्या हातांत तरवार घेऊन राजाच्या अंगावर धांवली; पण काळालाहि भय उत्पन्न करणारी ती कृत्या आपल्यावर चालून येत आहे असें पाहत असतांहि अंबरीष आपल्या स्थानावरून किंचित् देखील हालला नाहीं ॥ ४७ ॥ नाश करण्यासाठीं कृत्या धांवून आली, तोंच संतापलेल्या सापाला जसें एखाद्या वणव्यानें जाळावें, त्याप्रमाणें भक्ताचें संकट हरण करणाऱ्या त्या सुदर्शनचक्रानें तिला तेव्हांच जाळून टाकिलें. संकटसमयीं भक्ताचें रक्षण करावें म्हणून भगवंतानें आधींच हें चक्र त्याला दिलें होतें ॥ ४८ ॥ कृत्येला जाळल्यावर तें दुर्वास-मुनीच्या पाठीस लागलें. तेव्हां आपण केलेला प्रयत्न व्यर्थ जाऊन उलट आपल्यावरच येऊन बेतली असें पाहून दुर्वास घाबरला आणि प्राण वांचविण्यासाठीं दाही दिशांस पळत सुटला ॥४९॥ प्राणभयानें पळणाऱ्या सर्पाच्या मागें धगधगलेल्या ज्वाळांनीं प्रदीप्त झालेला वणवा पेटत जावा, त्याप्रमाणें आपल्या मागें धांवणाऱ्या त्या सुदर्शनचक्रास पाहून दुर्वास-ऋषि आश्रयासाठीं मेरुपर्वताच्या गुहेंत शिरण्याकरितां, सर्व दिशांनीं पळत आकाश, पृथ्वी, पाताळ, समुद्र, सर्व लोक व स्वर्ग असा हिंडला; पण जिकडे जिकडे तो गेला तिकडे तिकडे तें सुदर्शन त्याच्या मागें होतेंच. त्याला लपून बसण्यासारखी सर्व त्रैलोक्यांत एकहि सुरक्षित जागा दिसेना व ज्याची प्रार्थना केली असतां तो आपलें रक्षण करील असा एकहि सामर्थ्य-वान् पुरुष आढळेना ॥ ५० ॥ ५१ ॥ हे राजा, शेवटीं अतिशय घाबरून तो दुर्वास-ऋषि ब्रह्मदेवाला शरण गेला आणि त्या उग्र सुदर्शनचक्रापासून रक्षण करण्याविषयीं त्याची त्यानें प्रार्थना केली ॥ ५२ ॥

तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला,—बा दुर्वासा, तूं म्हणतोस तें खरे; पण त्या महासमर्थ प्रभूची शक्ति आंवरण्याचें सामर्थ्य कुणाला आहे ? अरे ! माझ्यासकट हें सारें जग त्यानें आपल्या क्रीडेसाठीं निर्माण केलें आहे. ती त्याची क्रीडा दोन परार्ध वर्षांनीं संपली, म्हणजे तो माझ्यासुद्धां हें सारें जग क्षणर्धात जाळून टाकील. शंकर, दक्ष, भृगु इत्यादि प्रजापति आणि भूपति, सर्व देव आणि मीसुद्धां केवळ त्याच्या आज्ञेप्रमाणें वर्तन करणारा आहें. अशा त्या देवाधिदेवाच्या भक्ताचा छळ तूं करीत असल्यामुळें, तुझें रक्षण आम्ही कसें करूं शकणार ? ॥५३॥ ५४॥ ह्याप्रमाणें ब्रह्मदेवानें नकार दिला असतां, सुदर्शनानें त्रासलेले दुर्वासमुनि कैलासपति शंकराला शरण गेले ॥५५॥

तेव्हा भगवान् शंकर म्हणाले,—बाबा रे, आम्हीं तुझें रक्षण करण्यास समर्थ नाहीं. ब्रह्मदेव, सनत्कुमार, नारद, कपिल इत्यादि ' मी मी ' म्हणणारे आम्हीं सर्वजण ज्या

ब्रह्मांडांत आहें, अशीं अनंतकोटी ब्रह्मांडें जो परमेश्वर वाटेल तेव्हां उत्पन्न करतो व वाटेल तेव्हां नाहींशीं करतो, त्या सर्वशक्तिवान् प्रभूच्या या सुदर्शनचक्राचें निवारण करण्यास आम्ही अगदीं असमर्थ आहों. या चक्रापासून संरक्षण करण्यास एक तोच समर्थ आहे. यासाठीं तूं श्रीहरीला शरण जा ! म्हणजे तोच तुझें रक्षण करील ! ॥ ५६॥ ५७॥ ॥५८॥ ५९॥ हे राजा, ज्याला शरण गेलें असतां आपलें रक्षण होईल असा दुर्वासाला मोठा भरंवसा वाटत होता, त्या शंकरानेंच जेव्हां श्रीविष्णूकडे बोट दखविलें, तेव्हां शेवटीं जेथें लक्ष्मीकांत प्रभूचें वास्तव्य, अशा त्या वैकुंठलोकांत जाऊन त्यानें भगवंताच्या चरणांवर लोटांगण घातलें आणि तो म्हणाला, — हे अच्युता भक्तपालका, तुझा पराक्रम न जाणल्यामुळें मी तुझ्या भक्ताचा अपराध केला आहे. तरी तूं दया करून माझें रक्षण कर ! ॥ ६० ॥ ६१ ॥ ६२ ॥

हे राजा, नंतर परमदयाळु भगवान् त्याला म्हणाले,--हे मुने, भक्तांच्या कामामध्यें माझें चित्त गढून गेल्यामुळें व मला भगवद्भक्त फार प्रिय असल्यामुळें मी निरंतर भक्तांच्या आधीन असतों. यास्तव आपल्या दुःखाचा परिहार करण्यास मीहि परतंत्रच आहें ॥६३॥ हे दुर्वासा, माझ्या भक्तांना मीच काय तो मुख्य आधार असल्यामुळें त्यांच्यावांचून मला या लक्ष्मीचीहि इच्छा नाहीं ॥६४॥ स्त्री, गृह, पुत्र, आप्त, ऐश्वर्य व संपत्ति यांजविषयींचें प्रेम टाकून जे मला शरण आले आहेत, त्यांचा त्याग मी कसा करूं बरें ? ॥ ६५ ॥ पतिव्रता स्त्रीचा पति जसा तिच्या कल्याणाविषयीं तत्पर असतो. तसा मीं त्याच्या कल्याणाविषयीं सदा तत्पर असतों ॥६६॥ माझ्या ठिकाणीं त्याची इतकी श्रद्धा असते कीं, माझ्या कृपेनें सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता ह्या चारीहि मुक्ति प्राप्त होत असतां, त्या सर्वश्रेष्ठ पदांची इच्छा न करतां ते निरंतर माझ्याच सेवेची इच्छा करतात. मग इतर अविनशी वस्तूंची कथा काय ? ॥६७॥ साधु माझें हृदय व मी साधूंचें हृदय. माझ्याहून दुसरें कांहीं ते जाणत नाहींत आणि मीहि त्यांच्याहून इतर कसली क्षिति बाळगीत नाहीं ॥६८॥ हे दुर्वासा, अशा स्थितींत तुला संकटनिवारणाचा उपाय सांगतों तो ऐक. ज्याच्यापासून तुझ्या या छळाचें मूळ उद्भवलें आहे, त्याच्याचकडे तूं जा ! साधूवर केलेला प्रहार तो करणाऱ्याचेंच अकल्याण करीत असतो ॥ ६९ ॥ तप आणि विद्या हीं दोनही ब्राह्मणांना मोक्षदायक आहेत; पण तींच दुराचारि पुरुषाला अनर्थकारक होतात ॥७०॥ यास्तव हे मुने, तूं अंबरीषराजाकडे जा आणि त्या महाभाग्यशाली राजाची क्षमा माग म्हणजे तुला शांति प्राप्त होईल ॥ ७१ ॥

### अध्याय चौथा समाप्त

# अध्याय ५ वा

शुकाचार्य म्हणाला,—हे राजा, भगवंतानें असें सांगितल्यावर सुदर्शनाच्या त्रासामुळें दु:ख पावलेल्या त्या दुर्वासऋषीनें शेवटीं अंबरीषाकडे येऊन त्याचे पाय धरिले ॥ १ ॥ हा प्रकार पाहून त्याला फार वाईट वाटलें आणि ब्राह्मणानें आपल्या पायां पडावें याची त्याला लाजहि वाटली. त्यामुळें ऋषीची सुटका व्हावी यासाठीं तो त्या विष्णूच्या सुदर्शनाची स्तुति करूं लागला ॥ २ ॥

तो म्हणाला,— हे सुदर्शना, तुला नमस्कार असो. तूं सहस्र धारांनीं संपन्न असून भगवंताला फार प्रिय आहेस. अग्नि, भगवान् सूर्य, ज्योतींचा अधिपति सोम, उदक, भूमि, आकाश, वायु,नाना प्रकारचे विषय,इंद्रियें हीं सर्व तूंच असून तुझ्यामुळें सर्व अस्त्रांचा नाश होतो ॥ ३ ॥ ४ ॥ हे चक्रा, तूं पृथ्वीचा रक्षक असून तुझा आंस सुंदर आहे. तूंच धर्म, सत्य,अमृत व यज्ञ असून यज्ञभोक्ता व लोकपालहि तूंच आहेस.तसेंच श्रेष्ठ प्रकारचें पौरुषतेजहि तूंच आहेस ॥५॥ हे सुदर्शना, तूंच धर्माचा आधार असून धर्मभ्रष्ट असुरांना धूमकेतूप्रमाणें दु:खद आहेस. तूं त्रैलोक्याचा रक्षणकर्ता असून तुझें तेज अत्यंत शुद्ध, वेग मनासारखा आणि पराक्रम अतर्क्य आहे. मी तुला नमस्कार करितों ॥ ६ ॥ हें वाचस्पते, तुझ्याच धर्ममय तेजानें सर्वत्र तमाचा नाश होत असून सूर्यादिक महात्म्यांचा प्रकाश कायम राहिला आहे.तुझा महिमा अवर्णनीय असून हें कार्यकारणात्मक चराचर जग तुझेंच स्वरूप आहे ॥७॥ हे अजित, श्रीहरीनें तुला सोडलें असतां तूं दैत्यदानवांच्या सैन्यांत शिरून त्यांचे हात, पाय मांड्या व माना कापीत त्या संग्रामांत झळकत असतोस ॥ ८ ॥ हे जगद्रक्षका, सर्व प्रहार सहन करणाऱ्या तुझी योजना श्रीविष्णूनें खास दुष्टांच्या नाशाकडेच केली आहे. तेव्हां आमच्या या कुलाच्या उत्कर्षाकरितां तूं विप्राचें कल्याण कर ! म्हणजे आम्हांवर मोठा उपकार होईल ॥ ९ ॥ जर मीं कांहीं दान केलें असेल, जर श्रद्धापूर्वक यजन केलें असेल, जर स्वधर्माचें अनुष्ठान केलें असेल आणि जर विप्र हेंच आमच्या कुळाचें दैवत असेल, तर हा ब्राह्मण निश्चिंत होवो ! ॥ १० ॥ सर्वभूतीं परमेश्वर आहे अशी माझी दृढ भावना असून त्यामुळें ईश्वर जर मजवर सुप्रसन्न झाला असेल, तर या ब्राह्मणाची संकटापासून सुटका होवो ॥ ११ ॥

शुकाचार्य म्हणाले,— हे राजा, याप्रमाणें अंबरीषानें स्तुति केल्यावर दुर्वासाला चोहोंकडून जाळणारें तें विष्णुचक्र सुदर्शन शांत झालें ॥ १२ ॥ तेव्हां अस्त्ररूपी अग्नीच्या तापापासून मुक्त होऊन निर्भय झाल्यामुळें दुर्वासऋषीला अत्यंत समाधान वाटलें व तो अंबरीषराजाला अनेक आशीर्वाद देऊन त्याची स्तुति करूं लागला ॥ १३ ॥

दुर्वास म्हणाला,— हे राजा, मी अपराधी असतांहि तूं माझें कल्याणच चिंतीत आहेस यावरून परमेश्वराच्या भक्तांचें अंतःकरण किती उदार असतें याचा आज मला

प्रत्यक्ष अनुभव आला ॥ १४ ॥ सात्वतांचा अधिपति जो भगवान् श्रीहरि त्याला ज्यांनीं आपलासा केला त्या महात्म्या सज्जनांना या जगांत कोणती गोष्ट करणें अशक्य आहे अथवा टाकावयाचीच म्हटली तर कोणती गोष्ट टाकणें त्यांना अशक्य आहे ? ॥१५॥ ज्याच्या नामाच्या केवळ श्रवणानें पुरुष निष्पाप होतो, अशा त्या पुण्यश्लोक श्रीहरीच्या दासांना या जगांत करावयाचें काय उरतें आहे ? ॥१६॥ हे राजा, माझ्या अपराधांकडे दुर्लक्ष करून आणि अत्यंत दयाळू अंतःकरणानें माझे प्राण रक्षण करून तूं मजवर केवढा तरी उपकार केला आहेस !॥१७॥हे परीक्षित्‌राजा,ह्या सुदर्शनाच्या पाठलागाची हकीकत राजास मुळींच माहीत नव्हती. मुनि आतां येईल मग येईल अशा समजुतीनें तो तसाच उपाशी राहिला होता.मुनि येऊन एकंदर हकीकत समजल्यावर त्याला फार दुःख झालें.त्यानें ताबडतोब सुदर्शनाची प्रार्थना करून दुर्वासऋषीची मुक्तता केली व अर्घ्यपाद्यादिकांनीं त्याची पूजा करून त्याला उत्तम भोजन दिलें॥१८॥तेव्हां आदरानें समर्पिलेलें आणि मनोरथ पूर्ण करणारें तें अन्न सेवन करून दुर्वास अत्यंत प्रसन्न झाला आणि त्यानें मोठ्या आदरानें अंबरीषासहि भोजन कर म्हणून सांगितलें॥१९॥तो आणखी म्हणाला, ‘हे राजा, तुझें दर्शन, तुझा हस्तस्पर्श आणि संभाषण यांनीं तसेंच आत्मस्वरूपाची ओळख करून देणाऱ्या या तुझ्या सत्कारामुळें मी अत्यंत संतुष्ट झालों आहें. तूं भगवद्भक्त असून मजवर मोठा अनुग्रह केलास. स्वर्गांतील अप्सरा तुझ्या या अत्यंत कृत्याचें वारंवार गायन करतील आणि ह्या भूमीवर तुझी धवल कीर्ति नित्य गर्जत राहील ॥२० ॥ २१ ॥

शुकाचार्य म्हणाले, — हे राजा, ह्याप्रमाणें संतुष्ट झालेल्या दुर्वासानें राजाची स्तुति केली आणि त्याचा निरोप घेऊन तो निष्काम कर्मानींच प्राप्त होणाऱ्या ब्रह्मलोकीं आकाशमार्गानें निघून गेला ॥२२॥ हे राजा, सुदर्शन पाठीस लागल्यामुळें पळून गेलेला दुर्वासऋषि परत येईपर्यंत सुमारें एक वर्ष लोटलें व तोपर्यंत अंबरीषराजा त्याची वाट पाहत उदक प्राशन करून राहिला होता ॥ २३ ॥ दुर्वास गेल्यानंतर त्यानें ग्रहण केल्यामुळें पवित्र झालेलें तें अन्न राजानें भक्षण केलें; मग ऋषीवर आलेलें संकट व त्यापासून झालेली त्याची मुक्तता यांचा विचार करीत असतां त्या प्रसंगीं दिसून आलेलें सामर्थ्य म्हणजे परमेश्वराचाच प्रभाव होय असें त्याचें मत झालें ॥ २४ ॥ अशा त्या सर्वगुणसंपन्न अंबरीषानें आपलीं सर्व कर्में परमात्मा भगवान् वासुदेवाला अर्पण करून त्याची भक्ति केली व त्या तीव्र भक्तियोगानें त्याला ब्रह्मलोकादि स्थानें नरकाप्रमाणें तुच्छ वाटूं लागलीं ॥ २५ ॥ नंतर सच्छील अशा आपल्या पुत्रावर राज्यभार सोंपवून व परमात्म्या वासुदेवाच्या चरणीं चित्ताचा लय लावून तो तपश्चर्येसाठीं वनांत गेला व तेथें त्रिगुणचा प्रवाह अशा या संसाराचा नाश करून ब्रह्मत्व पावला ॥ २६ ॥ हे राजा, ह्याप्रमाणें या महाभगवद्भक्त अशा अंबरीषराजाचें हें पवित्र चरित्र मीं तुला सांगितलें. या पुण्यप्रद आख्यानाचें कीर्तन आणि चिंतन करणाऱ्या पुरुषावर ईश्वर प्रसन्न होतो ॥ २७ ॥

**अध्याय पांचवा समाप्त**

# अध्याय ६ वा

शुकाचार्य म्हणतात, –हे राजा, अंबरीषाला विरूप, केतुमान् आणि शंभु असे तीन पुत्र होते. त्यांपैकीं विरूपापासून पुढें पृषदश्व झाला आणि पृषदश्वापासून रथीतर झाला ।। १ ।। रथीतर संतति न होतांच मरण पावला. म्हणून संततीसाठीं आंगिरसऋषीची प्रार्थना केल्यावरून त्यानें रथीतराच्या स्त्रीच्या ठिकाणीं ब्रह्मतेजानें युक्त असे पुत्र उत्पन्न केले ।। २ ।। रथीतराच्या स्त्रीपासून ते झाले होते, तथापि त्यांना आणखी आंगिरस असें म्हणू लागले व ते क्षत्रिय तेजानें युक्त असे ब्राह्मण असल्यामुळें रथीतराच्या एकंदर कुळांत त्यांनाच विशेष महत्त्व आलें ।। ३ ।। असो. वैवस्वतमनु एकदां शिंक देत असतां त्याच्या नाकांतून एक पुत्र जन्मास आला. तो इक्ष्वाकु होय. इक्ष्वाकूला शंभर पुत्र होते. त्यांतील विकुक्षि, निमि आणि दंडक हे वडील होत ।। ४ ।। हे राजा, या शंभर पुत्रांपैकीं पंचवीस जण आर्यावर्ताच्या * पूर्वभागांतील राजे झाले, पंचवीस पश्चिम भागाचे राजे झाले, तिघे जण मधल्या भागाचे झाले आणि उरलेले पुत्र इतर प्रदेशांचे राजे झाले ।। ५ ।। एके दिवशीं अष्टकाश्राद्ध असल्यामुळें इक्ष्वाकु विकुक्षिनामक पुत्राला म्हणाला, – ' बाळा विकुक्षे, लवकर जा आणि श्राद्धकर्माला योग्य असें मांस घेऊन ये ! ' ।। ६ ।। ' ठीक आहे, आणतो ' असें म्हणून विकुक्षि अरण्यांत गेला आणि श्राद्धकर्माला योग्य असे कित्येक पशु त्यानें मारिले; पण त्यामुळें तो थकून गेला आणि त्याला भूकहि फार लागली. तेव्हां त्या पराक्रमी मुलाला बापाच्या सांगण्याचा विसर पडला आणि त्यानें त्या मारिलेल्या पशूंपैकीं एक ससा खाऊन टाकिला ।।७।। उरलेले पशु त्यानें पित्याला आणून दिले आणि मग इक्ष्वाकूनें त्यांचें प्रोक्षण करा,अशी गुरु वसिष्ठाला विनंति केली.तेव्हां विकुक्षीनें केलेला प्रकार वसिष्ठाच्या ध्यानीं येऊन तो म्हणाला, 'हें मांस दोषी झालें आहे.हें श्राद्धकर्माच्या उपयोगाचें नाहीं!'।।८।। याप्रमाणें वसिष्ठगुरूनें सांगितल्यावरून आपल्या मुलानें काय केलें हें इक्ष्वाकु राजाला समजल्यावर त्यानें रागानें त्या मुलाला अनुचित कर्म करणारा म्हणून देशाबाहेर घालवून दिलें ।। ९ ।। इक्ष्वाकुराजा ब्रह्मज्ञानी असून वसिष्ठासह नित्य अध्यात्मविषयाची चर्चा करीत असे. त्यामुळें तो योगी झाला आणि योगमार्गानें आपल्या देहाचा त्याग केल्यामुळें त्याला ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति झाली ।।१०।। पिता इक्ष्वाकु मरण पावल्यावर विकुक्षि देशान्तराहून परत आला आणि राज्य करूं लागला. त्याला पूर्वीच्या गोष्टीवरून लोक शशाद म्हणजे ससा खाणारा असें म्हणत. त्यानें अनेक यज्ञ करून श्रीहरीला संतुष्ट केलें ।। ११ ।। विकुक्षीला पुरंजय नांवाचा पुत्र होता. त्याला आणखी इंद्रवाह आणि ककुत्स्थ अशींहि नांवें होतीं. हे राजा, हीं नांवें त्याला

---

* हिमालय आणि विन्ध्य या पर्वतांमधील पवित्र भूमि म्हणजे आर्यावर्त.

ज्या कर्मामुळें मिळालीं तीं सांगतों ऐक ॥ १२ ॥ कृतयुगाच्या शेवटीं देवांचें दानवांबरोबर युद्ध झालें. त्यांत दैत्य देवांचा पराभव करूं लागल्यामुळें देवांनीं या पराक्रमी पुरंजयाला साहाय्यासाठीं बोलाविलें ॥ १३ ॥ त्या वेळीं इन्द्र माझें वाहन होईल तर मीं येतों, असें पुरंजयानें म्हटलें असतां विश्वरूपी विष्णूच्या सांगण्यावरून इंद्रानें त्याचें वाहन होण्यासाठीं मोठ्या बैलाचें रूप घेतलें ॥ १४ ॥ मग अंगांत चिलखत घालून, आणि हातांत दिव्य धनुष्य आणि तीक्ष्ण बाण घेऊन पुरंजय त्या बैलावर आरूढ होऊन त्याच्या वशिंडावर बसला. त्या वेळीं सर्व देव त्याची स्तुति करूं लागले ॥ १५ ॥ त्याचें बळ परमात्मा भगवान् विष्णूच्या तेजामुळें अचाट वाढलें आणि त्यानें देवांना बरोबर घेऊन दैत्यांच्या नगरीला पश्चिमेकडून वेढा दिला ॥ १६ ॥ तेथें त्याचें दैत्यांबरोबर जें तुंबळ युद्ध झालें त्याचें वर्णनहि अंगावर शहारे आणणारें आहे. त्या युद्धांत जे दैत्य त्याच्या समोर आले त्या सर्वांना पुरंजयानें आपल्या भाल्यांनीं भोसकून यमसदनीं पाठविलें ॥ १७॥ त्याच्या बाणांचा मारा प्रळयकाळाच्या अग्नीसारखा असह्य होता. अर्थात् त्याला तोंड द्यावयाचें सोडून सर्व दैत्य मृत्यूच्या भीतीमुळें पळून गेले आणि आपल्या घरीं दडून बसले ॥ १८ ॥ अशा रीतीनें राजर्षि पुरंजयानें तें सर्व नगर आंतील सर्व संपत्तीसह जिंकून इंद्राच्या स्वाधीन केलें. या पराक्रमामुळें त्याला पुरंजय, इंद्रवाह आणि ककुत्स्थ अशीं नांवें मिळालीं ॥ १९ ॥ पुरंजयाला अनेना नांवाचा पुत्र झाला. अनेनाचा पुत्र पृथु पृथूचा विश्वरंधि, विश्वरंधीचा चंद्र आणि चंद्राचा पुत्र युवनाश्व ॥ २० ॥ युवनाश्वाला शाबस्त नांवाचा पुत्र होता, त्यानें शाबस्ती नांवाची नगरी वसविली. शाबस्ताला बृहदश्व हा पुत्र झाला आणि बृहदश्वापासून कुवलयाश्व झाला ॥ २१ ॥ हा कुवलयाश्व मोठा बलवान् होता. उत्तंकऋषीच्या मनांतील प्रिय गोष्ट करण्यासाठीं आपले एकवीस हजार पुत्र घेऊन त्यानें धुंधु नांवाच्या असुराचा वध केला ॥ २२ ॥ तेव्हांपासून कुवलयाश्व हा धुंधुमार या नांवानेंहि प्रसिद्ध झाला. धुंधूशीं युद्ध करीत असतां त्याच्या मुखांतून निघणाऱ्या अग्नीमुळें कुवलयाश्वाचे सर्व पुत्र जळून गेले; फक्त तीनच जिवंत राहिले ॥ २३॥ त्यांचीं नांवें दृढाश्व, कपिलाश्व आणि भद्राश्व अशीं होतीं. त्यांपैकीं दृढाश्वाचा पुत्र हर्यश्व नांवाचा असून त्याचा पुत्र निकुंभ होय ॥ २४ ॥ निकुंभाचा पुत्र बर्हणाश्व, बर्हणाश्वाचा कृशाश्व आणि कृशाश्वाचा सेनजित् हा होय. सेनजिताला युवनाश्व नांवाचा पुत्र होता; पण त्याला संतती नसल्यामुळें तो वानप्रस्थ स्वीकारिता झाला ॥ २५ ॥ त्याच्या शंभर स्त्रिया असून त्याहि त्याच्या बरोबर वनांत गेल्या. तेथें तो दु:खित अंत:करणानें राहात असतां ऋषींना त्याची दया आली आणि अत्यंत शांत चित्त असलेल्या त्यांनीं युवनाश्वासाठीं ऐंद्री नांवाची इष्टि केली ॥ २६ ॥ ती इष्टि चालली असतां एका रात्रीं युवनाश्वराजा, तहान लागल्यामुळें पाणी पिण्यासाठीं यज्ञमंडपांत गेला. तेथें सर्व ब्राह्मण झोपीं गेले होते. तेव्हां पाणी देण्यास कोणी नाहीं असें पाहून राजानें स्वत:च तेथील अभिमंत्रण केलेलें पाणी घेऊन ते पिऊन टाकिलें॥ २७॥ पुढें ब्राह्मण जागे झाल्यानंतर उठून पाहातात, तों कलशांत पाणी

नसून तो रिकामा झाला आहे. तें पाहून ते विचार करूं लागले कीं, कोणाचें काम हें! पुत्रोत्पत्ति करणारें हें पाणी प्यालें तरी कोण? ॥ २८ ॥ युवनाश्वानेंच तें पिऊन टाकिलें असें समजल्यावर ईश्वरी प्रेरणेमुळेंच ही गोष्ट घडली असें वाटून आणि दैवाचें सामर्थ्य हेंच खरें, इतर सामर्थ्य व्यर्थ होय, असें म्हणून त्यांनीं ईश्वराला हात जोडिले ॥ २९ ॥ मग तें पाणी प्याल्यामुळें युवनाश्वाच्या पोटांत गर्भ राहिला आणि योग्य काळ झाला असतां त्याची उजवी कूस फोडून चक्रवर्ती राजचिन्हें धारण करणारा पुत्र जन्मास आला ॥ ३० ॥ त्याला पाहून ब्राह्मण म्हणूं लागले, आतां हा मुलगा पिणार कुणाच्या अंगावर? दुधासाठीं तर हा सारखा आक्रोश करीत आहे! ब्राह्मणांचें चिंताजनक बोलणें ऐकूण इंद्र पुढें झाला आणि म्हणाला, हा मुलगा मला * पिईल! असें म्हणून इंद्रानें आपलें अंगठ्याजवळचें बोट त्या मुलाच्या तोंडांत चुंफावयास दिलें ॥ ३१ ॥ हा मुलगा बापाची कूस फोडून बाहेर निघाला तरी सुद्धां देव व ब्राह्मण यांच्या कृपेमुळें बापाला मरण मात्र आलें नाहीं. पुढें युवनाश्व तेथेंच तपश्चर्या करीत राहिला आणि तेणेंकरून आत्मस्वरूपाची त्याला प्राप्ति झाली ॥ ३२ ॥ राजा, या मुलाला इंद्रानें त्रसद्दस्यु असें नांव दिलें; कारण रावणआदिकरून दस्यु त्याला पाहून त्रासून जात ॥ ३३ ॥ असो. युवनाश्वाचा हा मांधातानामक पुत्र चक्रवर्ती राजा होऊन पृथ्वीचें राज्य करूं लागला. ईश्वरी कृपेच्या तेजानें त्या पृथ्वीवरील सप्त द्वीपांचें रक्षण तो एकटाच करी ॥ ३४ ॥ तो आत्मज्ञानी असून इंद्रियातीत अशा सर्वव्यापी भगवंताचें पूजन करण्यासाठीं त्यानें अनेक यज्ञ केले आणि त्यांत ब्राह्मणांना पुष्कळ दक्षिणा दिली ॥ ३५ ॥ यज्ञाला लागणारें द्रव्य मंत्र, विधि, यजमान, ऋत्विज, धर्म, देश, काल इत्यादि सर्व ईश्वराचेंच स्वरूप होय ॥ ३६ ॥ जेथें सूर्य उगवतो तेथून तो जेथें अस्तास जातो तेथपर्यंत सर्व प्रदेशावर युवनाश्वपुत्र मांधात्याचें राज्य होतें असें म्हणतात ॥ ३७ ॥ मांधात्यानें शशबिंदूची कन्या बिन्दुमती हिच्याशीं विवाह केला आणि तिच्यापासून त्याला पुरुकुत्स, अंबरीष आणि मुचकुंद असे तीन पुत्र झाले. त्यांपैकीं मुचुकुंद हा योगी झाला. या मुलांना पन्नास बहिणी असून त्या सर्वांनीं एका सौभरिनामक ऋषीला वरिलें ॥ ३८ ॥ एकदां हा सौभरिमुनि यमुनेच्या डोहांत बुडी मारून तप करीत असतां तेथें माशांचा राजा आपल्या स्त्रियांसह क्रीडा करीत विषयसुखाचा अनुभव घेत असलेला त्याच्या दृष्टीस पडला ॥ ३९ ॥ त्याला पाहून सौभरीच्या मनांत विषयभोगाची इच्छा उत्पन्न झाली. ती पुरविण्यासाठीं त्यानें मांधात्याकडे येऊन त्याच्याशीं मागणी घातली. त्याची मागणी ऐकून मांधाता म्हणाला, मुने, माझी जी मुलगी तुम्हांला आपण होऊन पसंत करील तिला आपण खुशाल घेऊन जा! ॥४०॥ हें उत्तर ऐकून सौभरीला वाटलें कीं, हा राजा, आपली थट्टा करितो, आपण वृद्ध असून अंगावर वळ्या पडल्या आहेत आणि अंग थरथर कांपत

---

* 'मां धाता' म्हणजे मला पिईल असें इन्द्रानें या मुलाविषयीं म्हटल्यामुळें त्या मुलाला मांधाता असें नांव प्राप्त झालें.

आहे त्यामुळें कोणत्याहि कन्येच्या मनास आपण येणार नाहीं, असें समजून राजानें हें थट्टेचें उत्तर आपल्याला दिलें ॥ ४१ ॥ कांहीं हरकत नाहीं. आतां आपण असें स्वरूप मिळविणार कीं त्यामुळें देवांगनांना सुद्धां मोह पडेल, मग सामान्य माणसांच्या स्त्रियांची कथा काय ? तेजस्वी सौभरीनें असा निर्धार केल्यावर अतिसुंदर असें तरुणाचें स्वरूप घेतलें ॥ ४२ ॥ द्वारपाळाला पुढें करून तो त्याच्याबरोबर त्या राजकन्यांच्या अंतःपुरांत गेला. तेथें प्रवेश केल्याबरोबर त्या पन्नासहि कन्या त्याच्यावर भाळल्या आणि सर्वांनीं त्या एकट्याला वरिलें ॥ ४३ ॥ इतकेंच नव्हे तर त्यांच्यांत आपसांत मोठा कलहदेखील चालू झाला. प्रत्येक कन्या त्याच्यावर इतकी मोहून गेली कीं—' हा पति मलाच अनुरूप आहे, तुम्हांला नाहीं '—अशा रीतीनें प्रत्येक कन्या आपापसांत भांडूं लागली. भांडतांना आपण पूर्वीच्या एकमेकींवर प्रेम करणाऱ्या बहिणी आहों हेंहि त्या विसरून गेल्या ॥४४॥ सौभरि ऋग्वेदाचा आचार्य होता व त्यानें तप करून अपरंपार तेज मिळविलें होतें. विवाह झाल्यावर तो अमोल साहित्यानें भरलेल्या वाड्यांत आपल्या स्त्रियांसह राहूं लागला. त्या वाड्याच्या भोंवतीं अनेक उपवनें व त्या उपवनांत स्वच्छ पाण्याचीं सरोवरें सुगन्धी कमळांनीं भरलेलीं होतीं ॥ ४५ ॥ वाड्यांत अनेक ठिकाणीं मूल्यवान् पलंग, शय्या, हरतऱ्हेच्या खुर्च्या, वस्त्रें, अलंकार, स्नानाचें साहित्य, उटया, खाण्याचे पदार्थ, फुलें इत्यादि सामग्री ठेवलेली असून सर्वत्र सोन्याच्या पिंजऱ्यांतील शुकसारिकादि पक्ष्यांचा मंजुळ शब्द, भ्रमरांचा गुंजारव व बंदीजनांचे स्तुतिपाठ चालले होते व त्यांतील सारे स्त्रीपुरुष सेवक उत्तम प्रकारें शृंगारलेले असत. अशा त्या वाड्यामध्यें सौभरि आपल्या स्त्रियांसह आनंदानें विषयसुखाचा अनुभव घेऊं लागला ॥ ४६ ॥ मांधाता पृथ्वीवरील साती द्विपांचा अधिपति होता. तथापि सौभरीचा हा गृहस्थाश्रमाचा प्रकार पाहून तोहि अगदीं चकित झाला आणि सार्वभौम राज्यवैभवामुळें त्याच्या मनांत जो अभिमान उत्पन्न झाला होता, तो पार मावळून गेला ॥ ४७ ॥ याप्रमाणें गृहस्थाश्रमांत दंग होऊन सौभरीमुनि अनेक प्रकारें विषयसुख घेऊं लागला पण कितीहि सुखभोग घेतला तरी तुपाच्या बिन्दूंनीं जशी अग्नीची तृप्ति झाली नाहीं ॥ ४८ ॥ अशा स्थितींत एकदां तो स्वस्थपणें विचार करीत असतां आपली अवनतस्थिति त्याच्या लक्षांत आली. आपण ऋग्वेदाचे आचार्य असून मत्स्यांची रतिक्रीडा पाहून आपल्या मनांत आलेल्या विचारामुळें हा स्वतःच्या आत्मरूपाचाहि विसर पडण्याइतका प्रसंग आला असें त्याला समजलें ॥ ४९ ॥ तेव्हां तो मनांत म्हणाला, ' अहो, मी तपस्वी आणि सदाचाराचें व्रत पाळणारा असतां माझी ही काय अवनति झाली पाहा ! दीर्घ काळपर्यंत ज्या ब्रह्मचर्यव्रताचें मीं रक्षण केलें, तें व्रत पाण्यांतील मत्स्यांची रतिक्रीडा पाहिल्यामुळें भंग पावलें ॥ ५० ॥ यास्तव ज्याला खरोखर मोक्षाची इच्छा असेल त्यानें गृहास्थश्रमाविषयीं पुरुषांचा संसर्ग सर्वस्वीं टाळणेंच अवश्य आहे. इंद्रियांना बाहेर सोडणें उचित नाहीं. एकटें राहून नित्य भगवान् परमेश्वरावर मन लावावें आणि करावयाचा असेल तर केवळ साधुलोकांचाच समागम करावा ॥ ५१ ॥ मी मूळचा तपस्वी एकटाच असतां पाण्यांतील माशांच्या संसर्गानें या

पन्नास स्त्रियांशीं संग केला आणि पांच हजार पुत्र निर्माण करणारा झालों ! इतकेंच नव्हे तर मायेच्या जाळ्यात सांपडून बुद्धि भ्रष्ट झाल्यामुळें विषयभोग हाच पुरुषार्थ असें मानूं लागलों आणि त्यायोगें इहलोक आणि परलोक यांसंबंधींच्या माझ्या इच्छांना अंतच नाहींसा झाला आहे ॥ ५२ ॥ याप्रमाणें विचार केल्यावर इतका काळ गृहस्थाश्रमांत काढणारा तो सौभरि लगेच विरक्त झाला आणि अरण्यांत निघून गेला. त्याच्या स्त्रिया पतिनिष्ठ असल्यामुळें त्याहि अर्थात् त्याच्या मागोमाग गेल्या ॥ ५३ ॥ तेथें आत्मज्ञानी सौभरीनें शरिराला क्षीण करणारें उग्र तप केलें आणि तिन्ही अग्नींसह परब्रह्मस्वरूपांत स्वत:चा लय केला ॥ ५४ ॥ हे राजा, पतीचे तें आत्मसमर्पणाचें कृत्य पाहून त्याच्याच सामर्थ्यानें त्याच्या स्त्रियांनींहि अग्नि शांत झाला असतां ज्वाळाहि जशा त्याचें अनुकरण करतात, त्याप्रमाणें आपल्या पतीचें अनुकरण केलें ॥ ५५ ॥

**सहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७ वा

शुकाचार्य म्हणतात,–हे राजा, मांधात्याचा अंबरीष म्हणून जो श्रेष्ठ पुत्र सांगितला, त्याला त्याच्या आजोबानें म्हणजे युवनाश्वानें मुलगा म्हणून घेतलें. त्या अंबरीषाला पुढें यौवनाश्वनामक पुत्र झाला. त्या यौवनाश्वाचा पुत्र हरीत असून या तिघांना म्हणजे अंबरीष, यौवनाश्व आणि हारीत यांना मांधात्याच्या कुळांतील श्रेष्ठ सजतात * ॥ १ ॥ मांधात्याचा पहिला पुत्र जो पुरुकुत्स त्याला नर्मदा नांवाची नागकन्या तिच्या भावांनीं दिली होती. गंधर्व हे नागांचे शत्रु असल्यांमुळें त्यांचा पराभव करण्यासाठीं आपल्या पतीला घेऊन येण्याविषयीं नागराजानें सांगितल्यावरून नर्मदा पुरुकुत्साला पाताळांत घेऊन गेली. पुरुकुत्साच्या ठिकाणीं दिव्य विष्णुशक्ति वास करीत असल्यामुळें त्यानें तेथें गंधर्वांचा निःपात केला. त्यामुळें संतुष्ट होऊन नागराजानें त्याला वर दिला कीं, जो कोणी या तुझ्या पराक्रमाचें स्मरण करील त्याला सर्पांपासून भय, राहाणार नाहीं ॥ २ ॥ ३ ॥ पूरुकुत्साला त्रसदस्युनामक पुत्र होता आणि त्रसदस्यूला असरण्य हा पूत्र झाला. अनरण्याचा पूत्र हर्यश्व, हर्यश्वाचा अरुण आणि अरुणाचा त्रिबंधन ॥ ४ ॥ त्रिबंधनाला त्रिशंकु नांवानें प्रसिद्धीस आलेला सत्यव्रतनामक पुत्र झाला. तो वसिष्ठगुरूच्या शापामुळें चांडाळ झाला. पण विश्वामित्रानें आपल्या तपःसामर्थ्यानें त्याला सदेह स्वर्गीं पाठविलें. तेव्हां देवांनीं त्याला खालीं लोटून दिलें असतां विश्वामित्रानें आपल्या तपोबळानें त्यास तेथेंच थोपवून धरिलें. अशा स्थितींत खालीं मान करून लोंबकळत राहिलेला तो त्रिशंकु अद्यापिहि आकाशांत दिसत आहे ॥ ५ ॥ ६ ॥ त्रिशंकूला हरिश्चंद्र नांवाचा मुलगा होता. या हरिश्चंद्राच्याच निमित्तानें वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्यामध्यें वाद उत्पन्न झाला आणि त्यांनीं पक्ष्यांचीं रूपें घेऊन अनेक वर्षें सतत युद्ध केलें * ॥ ७ ॥ हरिश्चंद्राला पुत्र नव्हता + म्हणून तो अंतःकरणांत खिन्न असे. तेव्हां एकदां नारदाच्या सांगण्यावरून तो वरुणाला शरण गेला आणि प्रभो, मला पुत्र होऊं दे अशी त्याची त्यानें प्रार्थना केली ॥ ८ ॥ तो म्हणाला, ' हे वरुणमहाराज, जर मला पराक्रमी पुत्र होईल, तर तोच बळी देऊन मी तुझी पूजा करीन ! वरुणानें ' ठीक आहे ' असें म्हटलें व त्याप्रमाणें योग्य काळीं हरिश्चंद्राला

---

* या श्लोकांतील प्रवृत्तः हें विशेषण यौवनाश्वाकडे घेऊन श्रीधरानें यौवनाश्वाला त्याच्या आजोबानें म्हणजे मांधात्यानें ऋषि म्हणून निवडलें असा दुसरा अर्थ केला आहे.

× हरिश्चंद्राच्या राजसूययज्ञांतील दक्षिणेच्या निमित्तानें विश्वामित्रानें त्याचा छळ केला. हें ऐकून वसिष्ठाला राग आला आणि त्यानें ' करकोचा पक्षी हो ! ' असा विश्वामित्राला शाप दिला. उलट विश्वामित्रानेंहि ' तूं बगळा हो ! ' असा वसिष्ठाला शाप दिला आणि दोघांमध्यें युद्ध झालें, अशी कथा आहे.

+ ऐतरेय ब्राह्मणांत 'हरिश्चंद्रो ह वैधसः ऐक्ष्वाको राजाऽपुत्र आस ' इत्यादि जी कथा आहे, तिचा बहुतेक शब्दशः अनुवाद येथें आला आहे.

पुत्र झाला. त्याचें नांव रोहित ॥ ९ ॥ पुत्र झालेला पाहून वरुण हरिश्चंद्राकडे येऊन म्हणाला, ' राजा, तुला पुत्र झाला, तरी ठरल्याप्रमाणें तो बळी देऊन माझी पूजा कर !' हरिश्चंद्रानें उत्तर केलें, वरुणा, यज्ञीय पशु दहा दिवस होऊन गेले म्हणजेच तो बळी देण्यास योग्य होतो ॥ १० ॥ हें ऐकून दहा दिवस लोटल्यावर वरुण पुन: आला आणि आतां हा पुत्र बळी देऊन माझी पूजा कर, असें हरिश्चंद्राला म्हणाला. तेव्हां हरिश्चंद्रानें पुन: उत्तर केलें, अहो, यज्ञीय पशूला दांत येतील तेव्हांच तो बळी देण्यास पात्र होतो ॥ ११ ॥ हें ऐकून वरुणानें आणखी वाट पाहिली आणि रोहिताला दांत आल्यावर पुन: हरिश्चंद्राला तो म्हणाला,–' अरे, याला दांत आले; आतां माझी पूजा कर. ! ' हरिश्चंद्रानें पुन: टाळाटाळ करून उत्तर दिलें, वरुणा, पशूचे पहिले दांत जेव्हां पडतात तेव्हांच तो यज्ञाला योग्य होतो ॥ १२ ॥ याहि वेळीं वरुणानें धीर धरिला आणि रोहिताचे पहिले दांत पडल्यावर तो हरिश्चंद्राला म्हणाला, अरे; या यज्ञीय पशूचे दांत आतां पडले तरी तो बळी देऊन माझी पूजा कर ! याहि वेळीं हरिश्चंद्रानें वरुणाला सांगितलें, अरे, पशूला पुन: दांत आले म्हणजेच तो शुद्ध होऊन यज्ञाला पात्र होतो ॥ १३ ॥ हें उत्तर ऐकूनहि वरुण परतला आणि रोहिताला दुसरे दांत आल्यानंतर आतां तरी माझी पूजा कर, याला दुसरेहि दांत आले असें हरिश्चंद्राला म्हणाला; पण हरिश्चंद्रानें पूर्वीचाच उपक्रम चालू ठेवून अरे, हा राजकुळांत उत्पन्न झालेला बळी जेव्हां चिलखत घालण्यासारखा होतो, तेव्हांच तो शुद्ध होतो असें उत्तर दिलें ॥ १४ ॥ याप्रमाणें पुत्राविषयींच्या प्रेमानें हरिश्चंद्राचें मन बांधून टाकिल्यामुळें त्यानें प्रत्येक वेळीं वरुणाची फसवणूक करून त्याला टाळाटाळीचीं उत्तरें दिलीं व वरुणानेंहि प्रत्येक वेळीं धीर धरून वाट पाहिली ॥ १५ ॥ पण केव्हां तरी हा टाळाटाळीचा प्रकार संपून आपल्याला बळी देण्याचा प्रसंग पित्यावर येणार असें रोहिताच्या लक्षांत आलें. तेव्हां तो प्राण वांचविण्यासाठीं हातांत धनुष्यबाण घेऊन पळून गेला ॥ १६ ॥ तो गेल्यावर इकडे वरुणाला राग आला व त्यामुळें हरिश्चंद्राला उदराची मोठी व्यथा जडली. ही वार्ता ऐकून रोहित परत गांवात यावयास निघाला; पण इन्द्रानें त्याला तसें करूं नको म्हणून सांगितलें ॥ १७ ॥ पवित्र स्थानाचें दर्शन करीत पृथ्वीवर हिंडणें हें पुण्यकारक आहे असेंहि इंद्र त्याला म्हणाला व त्याप्रमाणें रोहित आणखी एक वर्ष रानांतच राहिला ॥ १८ ॥ नंतर तो पुन: गांवांत यावयास निघाला असतां पुन: इंद्रानें वृद्ध ब्राह्मणाच्या वेषानें त्याच्यापुढें येऊन त्याला येऊं दिलें नाहीं. याप्रामाणें दुसऱ्या, तिसऱ्या, चौथ्या व पांचव्याहि वर्षाच्या शेवटीं प्रकार घडला ॥ १९ ॥ सहावें वर्षहि रोहितानें अरण्यांतच काढिलें आणि शेवटीं पुन: तो आपल्या नगरीला यावयास निघाला; पण या वेळीं त्यानें अजीगर्तऋषीपासून त्याचा मधला पुत्र विकत घेतला ॥ २० ॥ त्या मुलाचें नांव शुन:शेप असें होतें. आपल्या स्थानीं हा यज्ञीय पशु समजावा असें म्हणून रोहितानें शुन:शेपाला पित्याच्या स्वाधीन केलें आणि त्याला नमस्कार केला. याप्रमाणें बळी द्यावयासाठीं पुरुषपशु मिळाला असतां महाकीर्तिमान् हरिश्चंद्रानें वरुणाला उद्देशून नरमेध केला ॥ २१ ॥ त्या यज्ञांत त्यानें वरुण आदिकरून

देवांची पूजा केली; त्यामुळें तो उदराच्या व्यथेपासून मुक्त झाला आणि त्याची कीर्ति फारच वाढली, या यज्ञांत विश्वामित्रानें होत्याचें काम केलें, आत्मज्ञानी जमदग्नीनें अध्वयूचें काम केलें, वसिष्ठानें ब्रह्मयाचें काम केलें आणि अयास्यमुनीनें सामगायन करणाऱ्या उद्गात्याचें काम केलें. या यज्ञामुळें इंद्राला मोठा संतोष झाला आणि त्यानें हरिश्चंद्राला सोन्याचा रथ दिला ॥ २२ ॥ २३ ॥ असो. शुकाचार्य म्हणतात,—हे राजा, शुनःशेपाचेंहि महात्म्य मोठें आहे, पण तें मीं पुढें सांगेन. हरिश्चंद्राचें सत्यपालनाचें; धैर्याचें व्रत पाहून विश्वामित्रालाहि फार संतोष झाला आणि त्यानें हरिश्चंद्राला उत्तम गति मिळेल असा आशीर्वाद दिला. पुढें हरिश्चंद्राला ज्ञानप्राप्ति झाली. त्यानें आपल्या मनाचा पृथ्वीतत्त्वांत लय केला आणि पृथ्वीचा जलांत, जलाचा अग्नीचा वायूंत व वायूचा आकाशांत, असा लय करीत करीत त्यानें आकाशाची अहंकारांत धारणा केली आणि अहंकारालाहि महत्तत्त्वांत बिलीन केलें. मग त्या महत्तत्त्वांत त्यानें ज्ञानकलेचें ध्यान केलें आणि त्या ज्ञानकलेच्या योगानें अज्ञान साफ जाळून टाकिलें. नंतर आत्मस्वरूपाची प्राप्ति झाल्यावर त्यानें ज्ञानकलेचाहि त्याग केला. व सर्व बंधनाचा संपर्क सुटल्यामुळें पूर्ण साम्याच्या सुखाचा तो अनुभव घेऊं लागला. हें मोक्षसुख अमुक प्रकारचें आहे असें सांगणें किंवा त्याविषयीं तर्क करणें सर्वथा अशक्य होय ॥ २४ ॥ २५ ॥ २६॥ २७॥

**सातवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ८ वा

शुक्राचार्य सांगतात,—हे राजा, रोहिताचा पुत्र हरित आणि हरिताला चंप नांवाचा पुत्र होता. या चंपानें चंपा नांवाची नगरी वसविली. चंपापासून सुदेवाचा जन्म आणि सुदेवापासून विजयाचा जन्म झाला ॥ १ ॥ विजयाचा पुत्र भरुक व भरुकाचा वृक नांवाचा पुत्र होता. वृकाला बाहुक हा पुत्र झाला. बाहुकाचें राज्य शत्रूंनीं हिरावून घेतल्यामुळें तो आपल्या स्त्रियांसह वनांत गेला ॥ २ ॥ तेथें तो वृद्ध होऊन मरण पावला असतां त्याची मुख्य राणी सहगमन करूं लागली; पण ती गरोदर आहे असें पाहून और्व-ऋषीनें तिला तसें करूं दिलें नाहीं ॥ ३ ॥ ती गरोदर आहे असें पाहून तिच्या सवतींनीं तिला अन्नाबरोबर विष घातलें; पण त्यामुळें ती न मरतां तिला पुत्र झालाच. तो गरासह म्हणजे विषासह जन्मला असल्यामुळें त्याला सगर हें नांव पडलें व तो मोठा कीर्तिमान् झाला ॥ ४ ॥ सगर हा पुढें सार्वभौम राजा झाला आणि त्याच्या पुत्रांनीं सागर निर्माण केले. सगरानें तालजंघ, यवन, शक, हैहय आणि बर्बर या लोकांचा पराभव केला ॥ ५ ॥ पण और्व गुरूनें सांगितल्यावरून त्यानें त्या लोकांना ठार न करतां त्यांचीं रूपें मात्र विकृत केलीं, कांहींना दाढीमिशी ठेवून वरून मुंडण करावयास लाविलें, तर कांहींना मोकळे केस ठेवावयास लावून कांहींकडून त्यानें अर्धें मुंडण करविलें, आणि कित्येकांना आंतून वस्त्र घेण्याची बंदी केली, तर इतरांनीं बाहेरून तें घेऊं नये असें ठरविलें ॥ ६ ॥ पुढें त्यानें और्व गुरूंच्या सांगण्याप्रमाणें अनेक अश्वमेध यज्ञ करून सर्व वेदस्वरूपी आणि देवस्वरूपी अशा परमात्म्या भगवान् श्रीहरीचें पूजन केलें. त्याच्या एका अश्वमेधाच्या प्रसंगीं बळी द्यावयाचा पशु म्हणून सोडलेला घोडा इंद्रानें हरण केला ॥ ७ ॥ ८ ॥ त्याच्या सुमति नामक राणीचे पुत्र मोठे गर्विष्ठ पण पित्याची आज्ञा पूर्णपणें मानणारे होते. त्यांना घोड्याचा शोध करावयास पाठविलें असतां त्यांनीं पृथ्वी चोहोंकडून खणून टाकिली ॥ ९ ॥ तेव्हां ईशान्येच्या बाजूला कपिलमुनि ध्यानस्थ बसलेला होता, त्याच्याजवळ घोडा त्यांना दिसला. तेव्हां हाच तो आमचा घोडा पळविणारा चोर असून आतां डोळे मिटून बसला आहे, दुष्टाला ठार करा, मारा. असें ते साठ हजार सगरपुत्र ओरडून म्हणाले आणि शस्त्रें उपसून कपिलमुनीच्या अंगावर धांवले. त्यांचा गोंगाट ऐकून कपिलानें डोळे उघडले ॥ १० ॥ ११ ॥ इंद्रानें त्या सर्वांच्या मनाला भुरळ पाडिल्यामुळें आपण काय करतों हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं, पण थोर अशा कपिलमुनीचा त्यांनीं अपमान केल्यामुळें त्यांचें मरण ओढवलें आणि आपल्याच शरिरांत निघणाऱ्या अग्नीच्या योगानें ते एका क्षणांत जळून खाक झाले ॥ १२ ॥ शुक्राचार्य म्हणतात, हे राजा, याविषयीं कित्येक जणांचें असें म्हणणें आहे कीं, सगरराजाचे पुत्र कपिलमुनीच्या क्रोधाग्नीनें जळून गेले; पण सत्त्वशील अशा कपिलासंबंधानें असें म्हणणें ठीक नाहीं. साऱ्या जगाला पवित्र करणाऱ्या अशा थोर

पुरुषाच्या मनांत क्रोधरूपी अज्ञानाचा संचार होईल असें कसें घडेल ? पृथ्वीचे जड कण आकाशांत कधीं दिसतील काय ? ॥ १३ ॥ कपिलमुनीनें सांख्यशास्त्र प्रवृत्त करून जगाला जणूं काय भक्कम नावच तयार करून दिली आहे. या नावेचा आश्रय घेऊन मुमुक्षु लोक, हा दुस्तर आणि मृत्यूचा मार्गच असा संसारसमुद्र तरून जातात. असें असतां कपिला-सारख्या ब्रह्मस्वरूपी झालेल्या ज्ञानी पुरुषाला भेदबुद्धि उत्पन्न होऊन तो कोणाचा नाश करील हें कसें संभवेल ? ॥१४॥ असो. सगराला केशिनीनामक दुसऱ्या स्त्रीपासून झालेला असमंजस नांवाचा मुलगा होता. असमंजसाचा पुत्र अंशुमान्‌नामक असून तो आपल्या आजोबाचें हित करण्यांत अगदीं दक्ष असे ॥ १५ ॥ असमंजस हा पूर्वजन्मीं योगी असून कांहीं संसर्गदोषामुळें योगापासून भ्रष्ट झाला होता. पण त्याला पूर्वजन्मींचें स्मरण असल्या-मुळें या वेळीं आपण वेडगळ आहों असें तो लोकांना दाखवूं लागला ॥ १६ ॥ लोक ज्याची निंदा करितात, किंवा जे आपल्या बांधवांना अनिष्ट असेल, असें कर्म तो करी. आणि एकदां तर सरयु नदीच्या तीरीं खेळत असलेल्या मुलांना त्यानें प्रवाहांत फेंकून दिलें. हें पाहून लोकांना त्याच्याविषयीं मोठा उद्वेग आला ॥ १७ ॥ त्याचें असलें बर्तन पाहून त्याच्या पित्यानेंहि सर्व प्रेम बाजूला ठेवून त्याला नगरांतून हाकलून लाविलें; पण प्रवाहांत टाकिलेलीं मुलें त्यानें आपल्या योगसामर्थ्यानें परत आणून लोकांना दाखविलीं आणि मग तो तेथून निघून गेला ॥ १८ ॥ तेव्हां मुलें परत आलेलीं पाहून अयोध्येंतील सर्व लोकांना मोठें आश्चर्य वाटलें आणि सगरराजालाहि पश्चात्ताप झाला॥१९॥ असो.पुढें सगरानें घोड्याचा शोध लावण्याच्या कामीं अंशुमानाची योजना केली व त्याप्रमाणें तो निघाला. चुलत्यांनीं खणून केलेल्या मार्गानें जातां जातां त्याला भस्माच्या राशीजवळ तो घोडा दिसला ॥ २० ॥ तेथें जवळच कपिल नांव धारण करून ध्यानस्थ बसलेल्या भगवंताला पाहून थोर अंशुमानानें शांत मनानें हात जोडून त्याला नमस्कार केला आणि त्याची स्तुति केली ॥२१॥ अंशुमान् म्हणाला,—हे भगवन्, तूं ब्रह्मदेवाच्या पलीकडचा असल्यामुळें त्यालाहि तूं प्रत्यक्ष समाधींत दिसत नाहींस आणि तर्कानेंहि तुझें ज्ञान त्याला होत नाहीं; मग इतर आमच्यासारख्यांची कथा काय ? कारण आम्हीं तर सर्व जण कोणी त्या ब्रह्म-देवाच्या मनापासून, कोणी शरीरापासून, तर कोणी बुद्धीपासून असे उत्पन्न झालेले असल्यामुळें त्याच्या मानानें सर्वथैव अज्ञानी आहों ॥ २२ ॥ जे कोणी देहधारी प्राणी सत्त्वादि गुणांपासून उत्पन्न झालेल्या बुद्धीलाच मुख्य समजून त्या गुणांवर दृष्टि ठेवितात, फार काय पण त्या गुणांत देखील तमोगुणावरच विशेष लक्ष देतात, त्यांच्या अंत:करणांत तूं वास करीत असतांहि त्यांना तुझें ज्ञान होत नाहीं.कारण तुझ्या मायेनें त्यांचें चित्त मोहित झालेलें असल्यामुळें त्यांची दृष्टि अंतर्मुख नसून बहिर्मुख झालेली असते ॥ २३ ॥ तुझें स्वरूप शुद्धज्ञानमय आहे आणि सनन्दादि मुनींनाच त्याचें चिंतन करतां येतें. कारण स्वस्वरूपाच्या ज्ञानामुळें त्यांचा मायाजनित भेदभाव व त्यासंबंधींचा मोह नष्ट झालेला असतो; पण माझ्यासारख्या अज्ञान्याला तुझें ध्यान कसें करतां येईल ? ॥ २४ ॥ हे भगवन्, तुझ्या ठिकाणीं मायेनें निर्मिलेलीं सारीं गुणकर्मे विराम पावलीं असून तुझें स्वरूप

नामरूपांच्या पलीकडचें आणि व्यक्त व अव्यक्त यांहूनहि वेगळेंच आहे. तूं सनातन आदि-पुरुष असून लोकांना ज्ञानाचा उपदेश करण्याकरितांच देह धारण केला आहेस. त्या तुला आम्ही नमस्कार करितों ॥ २५ ॥ तूं हे सर्व लोक मायेनें निर्माण केले आहेस आणि असें असतांहि काम, लोभ, मत्सर, मोह इत्यादि विकारांनीं मनाला भ्रम झाल्यामुळें आम्ही सारे जण घरादारादि प्रपंचाला सत्य समजून संसारचक्रामध्यें फिरत राहिलों आहों ॥ २६ ॥ पण भगवंता, सर्वांच्या अंतर्यामीं आज तुझें दर्शन घडल्यामुळें वासना, कर्में आणि इंद्रियें यांच्या व्यापारामुळें आमच्या चित्ताभोंवतीं पडलेला दृढ पाश आतां मात्र अगदीं तुटून गेला आहे ॥ २७ ॥

शुकाचार्य सांगतात,—हे राजा, याप्रमाणें अंशुमानानें भगवान् कपिलाचा महिमा गाइला असतां त्याच्यावर मनःपूर्वक कृपा करून तो त्याला म्हणाला ॥ २८ ॥

भगवान् कपिल म्हणाला,—हे बाळा अंशुमाना, हाच घोडा तुझ्या आजोबाचा यज्ञीय पशु होय. याला घेऊन जा. हे जे तुझे चुलते येथें दग्ध होऊन पडले आहेत त्यांचा उद्धार करण्यास गंगेचें उदकच अवश्य आहे. इतर उदकानें कार्य होणार नाहीं ॥ २९ ॥ कपिलमुनीचें हें भाषण ऐकून अंशुमानानें त्याला मस्तक लववून प्रणाम केला आणि तो प्रसन्न झाला असें पाहून त्याला प्रदक्षिणा करून तो त्याच्या सांगण्याप्रमाणें घोडा घेऊन घरीं परत आला. नंतर सगरानें अवशिष्ट राहिलेला यज्ञ त्या घोड्याला बळी देऊन समाप्त केला ॥ ३० ॥ सगरराजानें वासनांचा त्याग केला होता आणि त्यामुळें संसारबंधनापासून तो मोकळा झालेला होता. यास्तव अश्वमेध समाप्त झाल्यावर त्यानें आपलें राज्य अंशु-मानाच्या स्वाधीन केलें आणि और्व गुरूनें सांगितल्याप्रमाणें योगसाधन करून ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतली ॥ ३१ ॥

## आठवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ९ वा

शुक्राचार्य सांगतात,—हे राजा, अंशुमानानें गंगेला भूलोकीं आणावें या इच्छेनें पुष्कळ काळपर्यंत तपश्चर्या केली; परंतु त्या कामीं त्याला यश आलें नाहीं आणि कालांतरानें तो मृत्यु पावला ॥१॥ त्याचा पुत्र दिलीप; त्यानेंहि तसेंच तप केलें व तोहि अयशस्वी होऊन कालवश झाला. पुढें दिलीपाचा पुत्र जो भागीरथ यानें मोठी तपश्चर्या केली ॥ २ ॥ त्याच्या तपानें गंगादेवी संतुष्ट झाली आणि त्याला दर्शन देऊन म्हणाली, ' हे भगीरथा, तुला वर द्यावयास मी सिद्ध आहें. ' तिचें भाषण ऐकून भगीरथानें आपल्या मनांतील गोष्ट तिला अत्यंत नम्रतेनें सांगितली ॥ ३ ॥ त्याचा अभिप्राय जाणून गंगादेवी म्हणाली,— ' हे भगीरथा, मीं भूमीवर येईन; पण आकाशांतून मीं खालीं येत असतां पृथ्वीवर माझा वेग सांवरून धरणारा कोणी तरी एक तयार असला पाहिजे. कारण तसें कोणी न केल्यास मी पृथ्वीचा पृष्ठभाग फोडून खालीं रसातळांत जाईन ॥४॥ पण, हे भगीरथा, दुसऱ्याहि कारणास्तव मला पृथ्वीवर येणें बरें वाटत नाहीं. कारण तेथें मी आल्यास लोक आपलें पातक धुऊन माझ्यांत टाकतील ! हे राजा, आतां विचार कर कीं, तें सारें पातक मग मी कोठें धुऊन काढूं ? ॥५॥ हें ऐकून भगीरथ म्हणाला हे देवि, सर्वसंगपरित्याग केलेले असे जे शांत स्वभावाचे ब्रह्मनिष्ठ साधु आहेत ते लोकांचें पाप नष्ट करणारे असून आपल्या शरिराच्या स्पर्शानें ते तुझेंहि पाप हरण करतील.कारण सर्व पापांचा नाश करणारा भगवान् परमात्मा त्यांच्या हृदयांत नित्य वास करतो ॥६॥ आतां तुझा वेग अडविला पाहिजे; तें कार्य सर्व प्राण्यांच्या अंतर्यामीं रहाणारा जो रुद्रदेव तो करील. कारण पटांत जसे आडवे-उभे तंतु असतात त्याप्रमाणें हें जग त्या रुद्रदेवामध्यें जिकडूनतिकडून गुंतविलें आहे ॥७॥ गंगादेवीला याप्रमाणें सांगितल्यावर भगीरथानें तपश्चर्या करून भगवान् शंकराला प्रसन्न केलें. थोड्याच काळांत शंकर भगीरथावर प्रसन्न झाला ॥८॥ भगीरथानें आपली इच्छा त्याला कळवितांच शंकरानें ' ठीक आहे. तसें करितो ' असें म्हटलें. कारण सर्व लोकांचें हित करणें हें त्या शंकराचें ब्रीदच आहे. मग श्रीहरीच्या पायांच्या स्पर्शामुळें जिचें उदक पवित्र झालें आहे अशी ती गंगा, आकाशांतून पृथ्वीवर पडूं लागली असतां तिला शंकरानें सावधपणें अडवून धरलें ॥ ९ ॥याप्रमाणें गंगा भूलोकीं आली असतां जगाला पवित्र करणाऱ्या त्या देवीला भागीरथराजानें पाताळांत नेलें. तेथें त्याच्या चुलत्यांच्या शरिरांचें भस्म होऊन पडलें होतें ॥ १० ॥ भगीरथराजा वायूसारख्या वेगानें धांवणाऱ्या रथांतून पुढें चालला असतां गंगादेवी सुद्धां वाटेंतील प्रदेश पवित्र करीत त्याच्या मागोमाग धांवत होती. पाताळांत पोंचल्यावर तिनें भस्म होऊन राहिलेल्या सगरपुत्रांना आपल्या पवित्र जलानें स्नान घातलें ॥ ११ ॥ सगरपुत्रांना ब्राह्मणाचा शाप होऊन मृत्यु आला होता व त्यांचीं शरिरेंहि जळून गेलीं होतीं. तथापि त्यांच्या भस्मालाहि त्या गंगाजलाचा संपर्क

झाल्याबरोबर ते शापमुक्त होऊन स्वर्गाला गेले ॥१२॥ शुकाचार्य म्हणतात, —हे राजा, याप्रमाणें भस्म होऊन गेलेल्या देहांवर गंगाजलाचा स्पर्श झाल्यानें सागर पुत्रांना जर स्वर्गप्राप्ति झाली, तर मग व्रत म्हणून श्रद्धापूर्वक जे गंगाजलांत स्नान करितील त्यांना स्वर्गप्राप्ति होईल यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. कारण तिची उत्पत्तीच मुळीं संसारपाशाचा नाश करणाऱ्या भगवान् विष्णूच्या चरणांपासून झाली आहे ॥१३॥१४॥भगवान् विष्णूच्याठायीं श्रद्धेनें मन लावूनच मुनिजन आपल्या पातकासून मुक्त झालेले असतात व त्यामुळेंच इतरांना सोडतां येण्यास कठीण अशा त्रिगुणांमुळें उत्पन्न झालेला देहसंबंध सोडून ते तत्काल विष्णुस्वरूपीं लीन होतात ॥१५॥ असो. भगीरथाला श्रुतनामक पुत्र झाला आणि त्याच्यामागून दुसरा नाभ नांवाचा झाला. त्या नाभापासून सिन्धुद्वीप झाला आणि त्या सिंधुद्वीपापासून पुढें अयुतायु झाला. अयुतायुताचा पुत्र ऋतुपर्ण. हा नलराजाचा मित्र असून नलापासून अश्वविद्या शिकला अणि त्याच्या मोबदल्यांत त्यानें नलाला द्यूतविद्या शिकविली. ऋतुपर्णाचा पुत्र सर्वकाम नांवाचा होता. ॥ १६ ॥ १७ ॥ सर्वकामाचा पुत्र सुदास. सुदासाच्या पुत्राला मित्रसह आणि केव्हां कल्माषपाद असेंहि म्हणत. हे राजा, हा मित्रसह साध्वी मदयन्तीचा पति असून वसिष्ठाच्या शापामुळें त्याला राक्षस व्हावें लागलें आणि स्वतःच्याच कर्मामुळें त्याला निपुत्रिक व्हावें लागलें ॥ १८ ॥

परीक्षित्‌राजा विचारतो,—हे शुकाचार्य, महात्म्या सुदासपुत्र मित्रसहाला वसिष्ठानें शाप देण्याचें कारण काय घडलें बरें? जर या प्रकारांत कांहीं गुप्त नसेल तर मला तें ऐकण्याची इच्छा आहे ॥ १९ ॥

राजाचा प्रश्न ऐकून शुकाचार्य म्हणाले, —हे राजा, एकदां सौदासराजा मृगया करीत असतां त्यानें एका राक्षसाला ठार केलें. त्या राक्षसाचा दुसरा भाऊ तेथें होता. तो मात्र निसटून पळाला आणि त्यानें राजाचा सूड घेण्याचा निश्चय केला ॥ २० ॥ कोणत्या मार्गानें राजाचें अनिष्ट करितां येईल याचा विचार केल्यावर त्यानें सौदासाच्या वाड्यांत येऊन स्वयंपाक्याचें काम पत्करिलें. मग एक दिवस वसिष्ठगुरु सौदासाकडे भोजनासाठीं आले असतां त्या राक्षसानें त्यांच्या पुढें शिजविलेलें मनुष्याचें मांस वाढिलें ॥ २१ ॥ आपल्यापुढें अभक्ष्य असें नरमांस वाढिलें आहे असें तत्काळ वसिष्ठाला समजलें आणि त्यामुळें राग येऊन त्यांनीं सौदासराजाला शाप दिला. ते म्हणाले,—ज्या अर्थी राक्षसाप्रमाणें तूं मला नरमांस वाढिलेंस, त्या अर्थी तुला राक्षसाचीच योनि प्राप्त होईल ॥ २२ ॥ शाप दिल्यावर वसिष्ठाला कळून आलें कीं, हा दोष स्वतः राजाचा नसून त्या स्वयंपाकी राक्षसाचा आहे. तेव्हां त्यानें लगेच तो शाप केवळ बारा वर्षेंच टिकावा असें ठरविलें. तथापि,आपल्याला निष्कारण शाप मिळाला असें पाहून सौदाससुद्धां ओंजळींत पाणी घेऊन वसिष्ठाला उलट शाप द्यावयास सिद्ध झाला ॥ २३ ॥ पण इतक्यांत त्याची राणी मदयंती पुढें झाली आणि तिनें त्याचें निवारण केलें. थोडा विचार केल्यावर राजाला दाही दिशा, आकाश, पृथ्वी इत्यादि सर्व जीवमय दिसूं लागलें; तेव्हां शाप द्यावयासाठीं ओंजळींत घेतलेलें उदक

कोठें टाकावें हें त्याला सुचेना. म्हणून शेवटीं त्यानें तें मंत्रयुक्त तीक्ष्ण जल आपल्या पायांवर टाकिलें ॥ २४ ॥ याप्रमाणें वसिष्ठशापामुळें तो राक्षस झाला आणि स्वत:चें शापोदक पायांवर पडल्यामुळें कल्माषपाद म्हणजे काळ्या पायांचाहि झाला. तो राक्षस होऊन रानांत फिरत असतां तेथेंच राहाणारें एक ब्राह्मणाचें दांपत्य त्याच्या दृष्टीस पडलें. त्या स्त्रीपुरुषांचा त्या वेळीं एकांत चालला होता ॥ २५ ॥ कल्माषपाद भुकेनें व्याकुळ झाला होता. तें जोडपें दृष्टीस पडतांच त्यानें त्यांपैकीं ब्राह्मणाला पकडिलें. तेव्हां त्याची पत्नी अनाथासारखी रडून कल्माषपादाला विनवूं लागली. ती म्हणाली, —अरे, तूं राक्षस नसून प्रत्यक्ष इक्ष्वाकूच्या कुळांतील पराक्रमी राजा आहेस ॥ २६ ॥ हे शूर राजा, साध्वी मदयंतीचा तूं पति असल्यामुळें असलें पाप करणें तुला योग्य नाहीं. तरी कृपा करून माझा पति मला परत दे ! ॥ २७॥ हे राजा, हा मनुष्यदेह सर्व पुरुषार्थांची प्राप्ति करून देणारा आहे; यास्तव हे पराक्रमी राजा, त्याचा घात करणें म्हणजे सर्व पुरुषार्थांचा नाश करणेंच होय असें म्हणतात ॥ २८ ॥ हा म्हणजे खरोखर विद्या, तप व शील इत्यादि उत्तम गुणांनीं संपन्न असून सर्वांच्या अंतर्यामीं असलेल्या, पण मायेमुळें दृष्टोत्पत्तीस न येणाऱ्या महापुरुषनामक परब्रह्माची आराधना करीत आहे ॥ २९ ॥ असा हा ब्रह्मर्षींमध्यें श्रेष्ठ असून तूंहि राजर्षींमध्यें अग्रणी आहेस. तेव्हां, हे धर्मज्ञ राजा, तुझ्या हातून याला मृत्यु येणें कसें उचित होईल ? अरे, पित्याच्या हातून मरण येणें योग्य आहे काय ? ॥ ३० ॥ हा माझा पति सदाचरणी व निष्पाप असून वेदाध्यन केलेला व यज्ञकर्मांत निष्णात आहे. तूंहि सज्जनांना मान्य आहेस. यास्तव याच्या वधाचा विचार तुला चांगला कसा वाटतो ? गाईच्या वधासारखाच हा नव्हे काय ? ॥ ३१ ॥ आतां तुझ्या मनांतून याला खावयाचेंच असेल,तर प्रथम मला खा ! त्याच्याशिवाय मी केवळ प्रेत होऊन पडणार ! मला क्षणभरहि जगतां येणार नाहीं.''॥ ३२॥ याप्रमाणें ती ब्राह्मणस्त्री अनाथाप्रमाणें विलाप करून याला करुणा आणण्याचा प्रयत्न करीत असतां,शापानें भ्रमिष्ट झालेल्या त्या सौदासराजानें त्या ब्राह्मणाला धरून वाघ ज्याप्रमाणें पशूला खातो त्याप्रमाणें खाऊन टाकिलें ! ॥ ३३॥ आपल्या ठिकाणीं पुत्राची उत्पत्ति करणार आपला पति राक्षसानें खाऊन टाकिलेला पाहून ब्राह्मणी शोक करूं लागली आणि राजाचा अतिशय राग आल्यामुळें त्या साध्वीनें त्याला शाप दिला ॥ ३४॥ ती म्हणाली,—' दुष्टा, मीं कामानें व्याकुळ झालें असतां तूं ज्या अर्थी माझा पति खाऊन टाकिलास, त्या अर्थी तुलाहि अशा प्रसंगानें मृत्युच येईल, हें मी तुला सांगून ठेवितें. तुझी बुद्धि नि:संशय भ्रष्ट झाली आहे. ॥ ३५ ॥ याप्रमाणें मित्रसहराजाला शाप दिल्यावर ती साध्वी पतिलोकीं जावयास सिद्ध झाली आणि त्याच्या अस्थि गोळा करून तिनें प्रज्वलित केलेल्या चितेंत टाकिल्या आणि आपणहि अग्निप्रवेश करून पतीच्या लोकीं गेली ॥ ३६ ॥ पुढें बारा वर्षें पुरीं झाल्यावर सौदासराजा शापमुक्त होऊन परत आला आणि आपल्या राणीशीं एकान्त करण्यास प्रवृत्त झाला; पण ब्राह्मणस्त्रीचा शाप मदयंतीला ठाऊक असल्यामुळें तिनें त्याचें निवारण केलें ॥ ३७ ॥ त्यानंतर राजानें स्त्रीसुखाचा त्यागच केला आणि अशा रीतीनें तो आपल्या कर्मामुळें निपुत्रिक झाला. तेव्हां त्याच्या

सांगण्यावरून वसिष्ठगुरूनें मदयन्तीच्या ठिकाणीं संतति उत्पन्न केली ॥ ३८ ॥ पण तो गर्भ मदयन्तीच्या उदरांत सात वर्षें राहिला असतांहि ती प्रसूत होईना; हें पाहून वसिष्ठानें तिचें उदर दगडानें फाडिलें आणि पुत्राला बाहेर काढिलें; या कारणास्तव त्या पुत्राला अश्मक असें नांव पडलें ॥ ३९ ॥ अश्मकाला पुढें मूलक नांवाचा पुत्र झाला. परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली त्या वेळीं स्त्रियांनीं सभोंवतीं गराडा देऊन त्याचें रक्षण केल्यामुळें, याला नारीकवच असेंहि म्हणतात. पुढील क्षत्रियांचा हा मूळ पुरुष असल्यामुळें त्याला मूलक नांव मिळालें ॥४०॥ मूलकापासून दशरथ झाला व दशरथापासून ऐडविड पुत्र झाला ऐडविडाचा पुत्र विश्वसहराजा व विश्वसहाला खट्वांग नांवाचा चक्रवर्ती पुत्र झाला ॥ ४१ ॥ दैत्यांशीं युद्ध करण्यासाठीं देवांनीं एकदां याची प्रार्थना केली असतां, या अत्यंत पराक्रमी खट्वांगानें युद्ध करून दैत्यांचा नाश केला. युद्धसमाप्तीनंतर आपलें दोन घटिकाच आयुष्य उरलें आहे असें याला समजतांच तत्काळ त्यानें आपल्या नगरीला येऊन परमेश्वराकडे मन लाविलें ॥ ४२ ॥ तो म्हणाला, –" माझ्या कुळाचें दैवत ब्राह्मण हे होत. त्यांच्यापेक्षां मला प्राणहि प्रिय नाहींत. फार काय पण पुत्र, वैभव, पृथ्वीचें राज्य, स्त्रिया हीं सुद्धां मला प्रिय वाटत नाहींत ॥ ४३ ॥ लहानपणीं सुद्धां माझ्या बुद्धीला अधर्माचें आचरण केव्हांहि रुचलें नाहीं आणि पुण्यश्लोक भगवंताखेरीज कोणत्याहि वस्तूकडे माझी दृष्टि वळली नाहीं ॥ ४४ ॥ मला काय पाहिजे तें देण्याचें वचन देवांनीं दिलें आहे व तिन्ही लोकांचे ते स्वामी असल्यामुळें त्याप्रमाणें ते देतीलहि; पण माझें चित्त श्रीहरीवर लागलें असल्यामुळें देवांच्या त्या वराची मला आतां गरजच नाहीं ॥ ४५ ॥ सर्व देवांचीं इंद्रियें व बुद्धि चळलेली असून त्यांच्या हृदयांत असलेला परमप्रिय परमात्मा त्यांनाहि दिसत नाहींसा झाला आहे, मग इतरांना तो कसा दिसणार ? ॥ ४६ ॥ यास्तव मी या विषयांची आसक्तिच टाकून देतों. ते परमेश्वरी मायेनें निर्माण केले असून ढगांच्या आकृतीइतकाच त्यांचा शाश्वतपणा आहे. आत्मस्वरूपामध्यें त्यांचा संग मायेमुळेंच वाढतो. ईश्वराची भक्ति करून तो संगच मी सोडतों व त्या परमात्म्यालाच आतां शरण जातों ॥ ४७ ॥ याप्रमाणें नारायणावर चित्त ठेवून मनाचा निश्चय केल्यावर विषयांच्या संबंधामुळें उत्पन्न झालेल्या अज्ञानाचा खट्वांगानें त्याग केला आणि आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतली ॥ ४८ ॥ तें आत्मस्वरूप म्हणजे सूक्ष्म व सर्वव्यापी असें जें परब्रह्म तेंच असून त्यालाच भगवद्भक्त ' भगवान् वासुदेव ' असें म्हणतात ॥४९॥

**नववा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १० वा

शुकाचार्य म्हणतात,--हे परीक्षित्राजा, खट्वांगापासून दीर्घबाहु झाला आणि दीर्घबाहूपासून रघु झाला. रघुराजानें मोठी कीर्ति मिळविली. त्याचा पुत्र अज व अजाचा दशरथ होय ॥ १ ॥ देवांनीं प्रार्थना केल्यावरून प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूपी श्रीहरीनें या दशरथाच्याच घरीं अंशाअंशानें चार पुत्रांच्या रूपानें अवतार घेतला. त्या पुत्रांचीं नांवें राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न हीं होत ॥ २ ॥ हे राजा, या रामावतारांतील श्रीहरीचें चरित्र तत्त्वज्ञानी अशा वाल्मीकिप्रभृति ऋषींनीं पुष्कळच वर्णिलेलें असून तूंहि तें अनेक वेळां ऐकिलें आहेस ॥ ३ ॥ श्रीरामचंद्रानें आपल्या पित्यासाठीं राज्याचा त्याग केला आणि प्रियपत्नीच्याहि हाताचा स्पर्श ज्यांना सोसवत नसे अशा आपल्या कोमल पायांनीं तो रानोरानीं हिंडला. त्याला मार्गांत झालेले श्रम वानरांचा नायक मारुति आणि भाऊ लक्ष्मण हे दूर करीत असत. शूर्पणखेचे कान व नाक कापून तिला विरूप केल्यामुळें त्याला आपल्या प्रिय सीतेचा विरह घडला व त्यामुळें त्याला क्रोध येऊन तो तिच्या शोधांत असतां त्याला विरोध करूं पाहणाऱ्या समुद्राला ज्यानें आपल्या केवळ भुंवया चढवून घाबरवून टाकिलें व त्यावर सेतु बांधिला आणि रावणादि दुष्ट दैत्यांचा वणव्याप्रमाणें नाश केला. असा तो कोशलदेशाचा अधिपति श्रीरामचंद्र आमचें रक्षण करो ! ॥ ४ ॥ विश्वामित्राच्या यज्ञाच्या प्रसंगीं त्यानें मारीच आदिकरून मोठमोठ्या राक्षसांचा लक्ष्मणाचें साहाय्य न घेतांहि पराभव केला ॥ ५ ॥ सीतास्वयंवरासाठीं उभारलेल्या मंडपांत मोठ्या पराक्रमी वीरांची सभा जमली असतां तेथें शंकराचें भयंकर धनुष्य तीनशें सेवकांनीं ओढीत आणिलें; पण हे राजा प्रभु रामचंद्रानें तें, हत्तीच्या छाव्यानें जसें एखादें उंसाचें कांडें घेऊन मोडावें तसें सहज लीलेनें वर उचलून त्याला दोरी लाविली आणि दोन्ही टोंकें वळवून तें मधोमध मोडून टाकिलें ॥ ६ ॥ याप्रमाणें पण जिंकून त्यानें लक्ष्मीचा अवतार अशी जी सीतादेवी तिची प्राप्ति करून घेतली. गुण, शील, वय, आणि सौंदर्य यांत ती त्याला सर्वस्वीं अनुरूप अशीच होती व म्हणूनच त्याच्या वक्षःस्थलावर विराजमान होण्याचा बहुमान तिला मिळाला. हा समारंभ आटोपून तो अयोध्येस जात असतां वाटेंत एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या परशुरामाशीं त्याची गांठ पडली आणि त्यानें परशुरामाचा इतका काळ वाढलेला गर्व नाहींसा केला ॥ ७ ॥ त्याचा पिता दशरथ, सत्याचें बंधन पाळणारा पण स्त्रीलंपट होता. तथापि त्याची आज्ञा रामानें शिरसा प्रमाण मानिली आणि सर्वसंगपरित्याग केलेला पुरुष ज्याप्रमाणें प्राणहि सहज सोडितो त्याप्रमाणें रामचंद्रहि राज्य, वैभव, प्रेमळ मित्र आणि आपला राजवाडाहि सोडून सीतेसह वनांत निघून गेला ॥ ८ ॥ तेथें रावणाची बहीण शूर्पणखा दुष्टबुद्धीनें त्याच्याकडे आली असतां त्यानें तिला विरूप केलें. त्याचें धनुष्य कोणाला सहन होण्यासारखें नव्हतें. त्या धनुष्यानें

त्यानें खर, त्रिशर, दूषण इत्यादि शूर्पणखेच्या बंधूंसह चौदा हजार राक्षसांचा वध केला व रानावनांत हिंडत तो हालअपेष्टा सोशीत तेथें राहिला ॥ ९ ॥ सीतेचा तो वृत्तान्त ऐकून रावणाच्या मनांत तिच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला आणि त्यानें तिला हरण करण्यासाठीं मारीचाला तिकडे पाठविलें.मारीच विलक्षण अशा हरिणाचें रूप घेऊन आलेला पाहून राम आश्रम सोडून त्याच्या मागोमाग गेला आणि दक्षप्रजापतीला ज्याप्रमाणें रुद्रानें ठार केलें, त्याप्रमाणें रामानेंहि बाण सोडून मारीचाचा तत्काल वध केला ॥ १० ॥ याप्रमाणें राम इकडे गुंतला असतां त्याच्या पाठीमागें त्या दुष्ट रावणानें आश्रमांत जाऊन जनककन्या जी सीता तिला लांडग्याप्रमाणें पळवून नेलें. अशा रीतीनें प्रियपत्नीचा विरह झाला असतां श्रीरामचंद्र लक्ष्मणासह बनांत एखाद्या क्षुद्र माणसाप्रमाणें हिंडूं लागला, आणि स्त्रीलंपट पुरुषांची स्थिति कशी होते हें आपल्या उदाहरणानें त्यानें दाखवून दिलें ॥११॥ रावण सीतेला घेऊन चालला असतां जटायूनें त्याला अडविलें. तेथें दोघांत झालेल्या झटापटींत जटायु मरण पावल्यामुळें त्याचें और्ध्वदेहिक कृत्य तसेंच राहिलें होतें. आपल्या कार्यासाठीं जटायु मरण पावला असें जाणून रामानें त्याला अग्निसंस्कार केला. त्यानें कबंधराक्षसाचा वध केला आणि वानरांशीं सख्य करून त्यांच्यायोगानें त्यानें सीतेचा शोध लाविला. मग त्यानें वालीचा वध केला आणि तेथून वानरराज सुग्रीवाचें सैन्य बरोबर घेऊन ब्रह्मदेव व शंकर हे ज्याच्या पायांचें वंदन करितात असा तो मनुष्यवेषधारी श्रीरामचंद्र समुद्राच्या तीरावर आला ॥ १२ ॥ तेथें समुद्रानें त्याला विरोध केला असतां, रामानें क्रोधाच्या आवेशांत डोळे वटारतांच समुद्रांतील नक्र, मगर इत्यादि प्राणी अगदीं गर्भगळित होऊन समुद्राचीहि गर्जना बंद झाली. मग तो समुद्र पुरुषरूपानें डोक्यावर पूजासंभार घेऊन रामचंद्राजवळ आला आणि त्याला वंदन करून म्हणाला ॥ १३ ॥ ' हे विश्वव्यापका श्रीरामचंद्रा, तूं अधिकारी असा आदिपुरुष असून सर्व विश्वाचा स्वामी आहेस. आम्हां मंदबुद्धींना तुझें ज्ञान कसें होणार ? तुझ्या सत्त्वगुणापासून देव निर्माण झाले, रजोगुणापासून प्रजापति झाले आणि क्रोधरूपी तमोगुणापासून भूतपति झाले. अशा प्रकारें तूं सर्व गुणांचा अधिपति आहेस ॥ १४ ॥ हे महाप्रतापी रामचंद्रा, आतां तूं खुशाल माझ्यावरून वाट करून जा व त्रैलोक्याला त्रस्त करून सोडणाऱ्या त्या रावणनामक विश्रव्याच्या दुष्ट पुत्राचा वध कर आणि आपल्या पत्नीला परत आण. माझ्यावर तूं सेतु बांध, म्हणजे त्यामुळें तुझी कीर्ति दिगंत पसरेल आणि दिग्विजय करणारे राजे त्या सेतूपाशीं आले असतां तुझें यश गाऊं लागतील ' ॥ १५ ॥ समुद्राच्या सांगण्याप्रमाणें रामचंद्रानें सेतु बांधिला. त्या सेतूकरितां अनेक पर्वतांच्या शिखरांवरून, वानरांकडून पाषाण आणावे लागले व ते आणीत असतां त्या शिखरांवरील वृक्ष गदगदां हालविले जात. पूर्वीं सीतेच्या शोधासाठीं पाठविलेल्या मारुतीनें लंकानगरी जाळून टाकिली होतीच. आतां सुग्रीव, नील, मारुति इत्यादि सेनापतींच्या हाताखालीं असलेल्या वानरसैन्यासह समुद्रापलीकडे गेल्यावर बिभीषणाच्या साहाय्यानें रामानें लंकेंत प्रवेश केला ॥ १६ ॥ वानरसेनापतींच्या त्या सैन्यानें लंकेंत प्रवेश करितांच आंतील क्रीडास्थानें, कोठारें,

भांडागारें, तशाच सार्‍या वेशी, सभा, मोठमोठ्या वाड्यांच्या गच्च्या, पारव्यांची खुराडीं इत्यादि सर्व जागा व्यापून टाकिल्या. तसेंच यज्ञगृहें, सुवर्णकलश, चौकांतील चबुतरे इत्यादिकांचा विध्वंस केला. त्या वेळीं हत्तींचा कळप नदींत शिरला असतां ती जशी खवळून जाते, त्याप्रमाणें वानरांच्या या कृत्यानें लंकानगरीहि क्षुब्ध होऊन गेली ॥ १७ ॥ हा धुमाकूळ दृष्टीस पडतांच राक्षसराजा रावणानें अनेक वीरांना त्यांच्यावर पाठविलें. निकुंभ, कुंभ, धूम्राक्ष, दुर्मुख, सुरान्त व नरांतक इत्यादि राक्षस, आपला पुत्र इंद्रजित, त्याचप्रमाणें प्रहस्त, अतिकाय, विकंपन इत्यादि दुसरे राक्षस आणि कुंभकर्ण हे सर्व त्यांत होते ॥ १८ ॥ ही सर्व राक्षससेना, तरवारी, भाले, धनुष्यें, प्रास, ऋष्टि, शक्ति, तोमर, खड्ग इत्यादि शस्त्रास्त्रांच्या योगानें भयंकर दिसत होती. तथापि लक्ष्मण, मारुति, गंधमादन, नील व अंगदादि वानरसेनापतींना समागमें घेऊन श्रीरामचंद्र तिच्यावर चालून गेला ॥ १९ ॥ रावणाच्या सैन्यांत हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांचा भरपूर भरणा होता; पण रामाच्या सर्व सेनापतींनीं तिच्यावर एकाएकीं चाल करून रावणाच्या योद्ध्यांशीं द्वंद्वयुद्धें सुरू केलीं सीतेला दुःख दिल्यामुळें रावणाच्या कल्याणाची समाप्ति झाली होती. अशा त्याच्या प्रमुखत्वाखालीं लढणार्‍या सैनिकांना अंगद आदिकरून वानरयोद्ध्यांनीं वृक्ष, पाषाण, गदा व बाण इत्यादिकांचा मारा करून जर्जर केलें ॥ २० ॥ याप्रमाणें आपल्या सैन्याचा नाश होऊं लागलेला पाहून रावणाला राग आला आणि तो स्वतःच विमानांत बसून रामाशीं युद्ध करावयास आला. त्या वेळीं इंद्रानें आपला दिव्य रथ, मातलीनामक सारथ्याबरोबर रामाच्या उपयोगासाठीं पाठवून दिला होता. त्या तेजस्वी रथांत बसून रामचंद्र आपला प्रभाव दाखवीत असतां रावणानें त्याच्यावर तीक्ष्ण बाणाचा मारा चालविला ॥ २१ ॥ रावण पुढें आलेला पाहून राम त्याला म्हणाला, ' हे नरमांसभक्षकाच्या पोरा धनी घरांत नसतांना एखादी वस्तु कुत्रा जसा पळवून नेतो, त्याप्रमाणें मी घरांत नसतां माझी पत्नी तूं निर्लज्जपणें पळवून नेलीस; पण हें निन्द्य कृत्य करणार्‍या तुला त्याचें फळ मी आजच देतों पाहा. काळाचा प्रभाव ज्याप्रमाणें अलंघ्य आहे त्याप्रमाणें माझेंहि वीर्य अलंघ्य आहे. ॥ २२ ॥ याप्रमाणें रावणाची निंदा करून रामानें धनुष्यावर चढविलेला बाण त्याच्यावर सोडिला. तो बाण वज्राप्रमाणें तीक्ष्ण असल्यामुळें त्याचा आघात होतांच रावणाचें हृदय विदीर्ण झालें व एखाद्या पुरुषाचें पुण्य संपलें असतां तो जसा स्वर्गांतून खालीं येतो, त्याप्रमाणें तो रावणहि आपल्या दहाहि तोंडांनीं रक्त ओकीत आपल्या विमानांतून खालीं पडला ॥ २३ ॥ रावणाचा वध झालेला ऐकून हजारों राक्षसस्त्रिया मंदोदरीसह लंकेंतून बाहेर पडल्या आणि दुःखानें रडत रडत रणभूमीवर धांवत गेल्या ॥ २४ ॥ त्या ठिकाणीं त्यांचे अनेक बांधव लक्ष्मणाच्या बाणांनीं व्याकुळ होऊन पडले होते. त्या राक्षसस्त्रियांनीं त्यांना आलिंगन दिलें आणि आपल्याच हातांनीं आपलें हृदय पिटीत अनाथ होऊन त्या मोठमोठ्यानें रडूं लागल्या ॥ २५ ॥ त्या म्हणाल्या,–' हे नाथ, हे रावणा, तूं आजपर्यंत सर्व लोकांना रडविलेंस खरें; पण आज तूं मरण पावल्यामुळें आम्ही कशा दीन झालों आहों पाहा ! लंकेला तुझा विरह होऊन शत्रूंनीं तिला वेढा दिला असतां तिनें रक्षणासाठीं

आतां कोणाच्या तोंडाकडे पाहावें ? ॥ २६ ॥ हे भाग्यशाली रावणा, कामवासनेला बळी पडल्यामुळें सीतेच्या तेजःसामर्थ्याची तुला कल्पनाच झाली नाहीं व त्यामुळें तुला ही दुर्दशा प्राप्त झाली ॥ २७ ॥ हे कुलनंदना रावणा, ही लंकानगरी आज विधवा झाली असून आमचीहि तीच गत झाली आहे आणि तुझें हें शरीर गिधाडांचें भक्ष्य होऊन तुझा आत्मा नरकाचा धनी झाला आहे ॥ २८ ॥

शुकाचार्य सांगतात,—हे परीक्षित्‌राजा, रावण वध पावल्यावर त्याचें व इतर बांधवांचें और्ध्वदेहिक कृत्य बिभीषणानें रामाची अनुज्ञा घेऊन यथाशास्त्र केलें ॥ २९ ॥ नंतर रामचंद्र तेथून अशोकवनांत गेला. तेथें आपल्या विरहाच्या दुःखानें अगदीं कृश झालेली अशी सीतादेवी शिंशपावृक्षाच्या बुंधाशीं बसलेली त्याच्या दृष्टीस पडली ॥ ३० ॥ आपल्या अत्यंत प्रिय पत्नीला तशा दीन अवस्थेमध्यें पाहातांच रामाला दुःखानें कंप सुटला; पण आपल्या दर्शनामुळें सीतेला आनंद होऊन तिचें कमलासारखें मुख प्रसन्न झालेलें पाहून त्याला जरा बरें वाटलें ॥ ३१ ॥ मग तिला घेऊन तो पुष्पकविमानांत बसला आणि लक्ष्मण,सुग्रीव आणि मारुति यांसह अयोध्येस येण्यास निघाला. तेथून निघण्यापूर्वी भगवान् रामचंद्रानें राक्षसांचें राज्यपद बिभीषणाला दिलें ॥ ३२ ॥ याप्रमाणें लंकानगरी बिभीषणाच्या ताब्यांत देऊन आणि कल्पसमाप्तीपर्यंत दीर्घायुष्यहि त्याला देऊन व्रतशाली राम अयोध्येस आला. मार्गांत लोकपालांनीं जागजागीं केलेल्या पुष्पवृष्टीमुळें त्याच्या विमानांत सर्वत्र फुलेंच फुलें झालीं ॥ ३३ ॥ आणि ब्रह्मदेवादि मोठमोठ्या देवांनींहि आनंदानें त्याच्या पराक्रमाचें वर्णन केलें. अयोध्येजवळ आल्यावर आपला भाऊ भरत गोमूत्रांत शिजविलेल्या यवान्नावर राहात असून वल्कलांशिवाय अंगावर कांहीं घेत नाहीं असें त्याला समजलें ॥ ३४ ॥ तसेंच त्यानें जटा वाढविल्या असून तो जमिनीवरच निजत आहे असें ऐकिल्यावर अत्यंत दयाळू अशा त्या रामाला फारच खेद झाला; पण राम आला हें ऐकून भरत अयोध्यावासी लोकांना व प्रधान आणि पुरोहित यांना समागमें घेऊन रामाला सामोरा जावयास निघाला. त्यानें रामाच्या पादुका आपल्या मस्तकावर घेतल्या आणि नंदिग्रामांतील आपल्या शिबिरांतून सुस्वर गाणीं गात व सनया, तुताऱ्या, कर्णे, नगारे इत्यादि वाद्यांच्या गजरांत तो बाहेर पडला ॥ ३५ ॥ ३६ ॥ त्याच्याबरोबर वेदवेत्ते ब्राह्मणहि निघाले व त्यांनीं सारखा वेदघोष चालू केला. त्या स्वारीबरोबर सोनेरी जरीकाठी पताका असून चित्रविचित्र ध्वजा फडकत असलेले सोन्याचे रथ चालत होते ॥ ३७ ॥ योद्ध्यानीं अंगांत सोन्याचीं कवचें घातलीं असून इतरहि त्यांची सामग्री सोन्याची होती व ते उत्तम जातीच्या घोड्यांवर आरूढ झाले होते. त्या स्वारीबरोबर आणखी व्यापाऱ्यांचे तांडे, कलावंतिणींचे ताफे आणि पायीं चालणारे अनेक चाकरनोकर होते ॥ ३८ ॥ रामाला योग्य असे छत्रचामरादि साहित्य आणि लहानथोर जातीचे विक्रीचे अनेक पदार्थ घेऊन सर्व मंडळी चालली असतां रामाचें दर्शन झाल्याबरोबर भरताच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. त्याचें हृदय उचंबळून आलें आणि त्यानें रामाच्या पायाला प्रेमानें मिठी मारिली ॥ ३९ ॥ त्यानें बरोबर आणिलेल्या पादुका रामाच्या पुढें

ठेविल्या आणि हात जोडून उभा राहिला. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु तर चाललेच होते. त्याला पाहातांच रामानेंहि दोन्ही हातांनीं दृढ आलिंगन दिलें आणि बराच वेळ आपल्या आनंदाश्रूंनीं त्याला स्नान घातलें ॥ ४० ॥ मग लक्ष्मण आणि सीता यांसह रामचंद्रानें सर्व वंद्य ब्राह्मणांना नमस्कार केला आणि त्यालाहि सर्व प्रजांनीं प्रणाम केला ॥ ४१ ॥ त्या वेळीं आपला राजा फार काळानें परत आलेला पाहून उत्तरकोसल देशांतील तेथें जमलेले सर्व लोक आपलीं वस्त्रें आनंदानें फडकावूं लागले आणि रामावर पुष्पवृष्टि करीत आनंदानें नाचूं लागले ॥४२॥नंतर भरतानें त्याच्या पादुका उचलून घेतल्या,सुग्रीव व बिभीषण त्याच्यावर चवऱ्या व अबदागीर वारूं लागले, आणि मारुतीनें श्वेतछत्र धरिलें ॥४३॥ शत्रुघ्नानें त्याचें धनुष्य व भाते आपल्याजवळ घेतले आणि सीतेनें तीर्थोदकाचा कमंडलु आपल्या हातांत घेतला. तसेंच अंगदानें त्यांची तरवार घेतली आणि जांबुवानानें सोन्यांत बसविलेली त्याची ढाल घेतली ॥ ४४ ॥ रामचंद्र स्त्रियांसह पुष्पकविमानांत बसला आणि बंदिजन त्याची स्तुति करूं लागले. अशा थाटांत ग्रहांसह उगवलेला चंद्र ज्याप्रमाणें शोभतो त्याप्रमाणें भगवान् रामचंद्र शोभूं लागला ॥ ४५ ॥ अशा रीतीनें भाऊ अभिनंदन करीत असतां रामानें अयोध्यानगरींत प्रवेश केला आणि आपल्या राजवाड्यांत गेल्यावर प्रथम त्यानें कैकयी आदिकरून सापत्न मातांना आणि स्वतःची माता कौसल्या हिला वंदन केलें. नंतर इतर वडील माणसें, बरोबरीचे स्नेही आणि लहान मुलें यांचाहि त्यानें यथोचित सन्मान केला आणि त्याचाहि सर्वांनीं तसाच उलट सन्मान केला. रामाच्या मागून सीता आणि लक्ष्मण यांनींहि त्या सर्वांचा सन्मान केला ॥ ४६ ॥ ४७ ॥ मग रामलक्ष्मणांच्या मातांनीं त्या आपल्या पुत्रांना मांडीवर घेतलें. प्रेतांत प्राण शिरल्यावर जशीं तीं उठावीं तशीच त्या मातांची स्थिति झाली. त्यांनीं त्यांच्यावर आनंदाश्रूंचा अभिषेक करून त्या जलानें आपलें दुःखच जणूं काय धुऊन काढिलें ॥ ४८ ॥ नंतर वसिष्ठगुरूनें इक्ष्वाकुवंशांतील वृद्धांकडून रामलक्ष्मणांच्या जटा सोडविल्या आणि चारी समुद्रांचें उदक आणून इंद्राला अभिषेक करावा त्याप्रमाणें रामाला अभिषेक केला. ॥ ४९ ॥ याप्रमाणें डोक्यावरून स्नान करून रामानें सुंदर वस्त्रें परिधान केलीं. पुष्पमाळा, रत्नजडित किरीटकुंडलादिक राजभूषणें व दरबारी पोषाख धारण केला, वस्त्रालंकारांनीं सजलेले भाऊ व पत्नी सीता बरोबर असल्यामुळें तो फारच शोभूं लागला ॥ ५० ॥ नंतर भरतानें नमस्कारपूर्वक केलेल्या विनंतीनें संतुष्ट होऊन राम सिंहासनावर बसला. त्याच्या सर्व प्रजा आपआपल्या धर्मानें मनःपूर्वक वागणाऱ्या असून चार वर्ण आणि चार आश्रम यांच्या नियमांनीं बांधिलेल्या होत्या. राम त्यांचें पित्याप्रमाणें रक्षण करूं लागला असतां त्याहि त्याला पित्यासमानच मानूं लागल्या ॥ ५१ ॥ शुकाचार्य म्हणतात,—हे राजा, राम राज्य करीत असतां जरी तें त्रेतायुग चाललें होतें, तरी तो धर्म जाणणारा असून सर्व प्राणिमात्राला सुख होईल अशा रीतीनें कारभार करीत असल्यामुळें कृतयुगाचाच भास होत असे ॥ ५२ ॥ हे परीक्षित्राजा, त्याच्या राज्यांत अरण्यें, नद्या, पर्वत, द्वीपें, खंड, समुद्र इत्यादि सर्वांपासून लोकांच्या इच्छा पूर्ण होऊं लागल्या ॥ ५३ ॥ इंद्रियनिग्रही राम राज्य

करीत असतां कोणालाहि मानसिक किंवा शारीरिक व्याधींपासून उपद्रव होत नसे. तसेंच अवेळीं वृद्धपण, शक्तिहीनता, नाना प्रकारचें दुःख, भय, थकवा यांची पीडा प्रजेला होत नसून कोणालाहि इच्छेविरुद्ध मरण येत नसे ॥ ५४ ॥ रामराजानें एकपत्नीव्रत कडकपणें पाळिलें. त्याचें शुद्ध आचरण सर्वस्वीं श्रेष्ठ अशा राजर्षीला उचित असेंच होतें. त्यानें आपल्या धर्माप्रमाणें गृहस्थाश्रमाचे आचार स्वतः चांगले पाळून इतरांनाहि धडा घालून दिला ॥ ५५ ॥ त्याची पत्नी साध्वी सीता त्याच्यावर अत्यंत प्रेम करणारी असून त्याच्या नित्य आज्ञेंत वागे. तिचें शील अनुकरणीय असून ती अत्यंत नम्र स्वभावाची होती. ती चतुर आणि आदरशील असून पतीच्या मनांतील भाव तत्काळ तिला समजे व त्यामुळें तिनें रामाचें मन अगदीं आपलेंसें केलें ॥ ५६ ॥

## दहावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ११ वा

शुकाचार्य म्हणतात,–हे परीक्षित्राजा, राज्याभिषेक होऊन रामराजा याप्रमाणें राज्य करूं लागल्यावर त्यानें उत्तम प्रकारच्या ऋत्विजांच्या साहाय्यानें अनेक यज्ञ केले आणि त्यांत सर्व विधि उत्तम प्रकारें करून ऐश्वर्यशाली रामानें अंत:करणपूर्वक सर्व देवस्वरूपी परमात्म्याची आराधना केली॥ १ ॥यज्ञाची दक्षिणा म्हणून त्यानें पूर्वदिशेकडील प्रदेश होत्याला दिले, दक्षिणेकडील प्रदेश ब्रह्माला दिले. अध्वर्यूला पश्चिम प्रांत दिला आणि उद्गात्याला उत्तर बाजू दिली ॥ २ ॥ या प्रदेशांमधील अवशिष्ट राहिलेली जी भूमि ती त्यानें आचार्याला दिली. कारण रामचंद्र स्वत: निरिच्छ असून सर्व पृथ्वी ब्राह्मणांना देणेंच योग्य आहे असें त्याचें मत होतें ॥ ३ ॥ याप्रमाणें सर्व देऊन टाकिल्यावर रामापाशीं त्याचे स्वत:चे अलंकार आणि वस्त्र आणि सीतादेवीपाशींहि तिचे सौभाग्यालंकार एवढेंच राहिले ॥ ४ ॥ ब्राह्मणाविषयीं प्रभु रामचंद्राला मोठें प्रेम होतें, तें पाहून ब्राह्मणानीं त्याची फार स्तुति केली. ते त्याच्यावर अगदीं संतुष्ट झाले. त्याच्या हृदयाला द्रव येऊन त्यांनीं त्याला सारी पृथ्वी परत दिली आणि ते त्याला म्हणाले ॥ ५ ॥ ' हे पृथ्वीपते रामचंद्रा, तूं आमच्या हृदयांत प्रवेश करून आपल्या तेजानें आमचें अज्ञान नाहींसें करीत असल्यामुळें तुझ्याकडून आम्हांला मिळालें नाहीं असें कांहीं तरी आहे काय ? ॥ ६ ॥ हे रामचंद्रा, तूं ब्राह्मणांचा कैवारी देव असून तुझी बुद्धि सर्वत्र अकुंठित विहार करिते. कीर्तिमान् पुरुषांमध्यें तूं श्रेष्ठ असून सर्वसंगपरित्याग करणारे मुनि आपल्या हृदयामध्यें तुझ्या चरणकमलाची स्थापना करितात. तुला आमचा नमस्कार असो ! '॥ ७ ॥ शुकाचार्य सांगतात,—हे राजा, याप्रमाणें रामाचा कारभार चालला असतां एके दिवशीं लोकांच्या मनांत काय आहे हें जाणण्याची इच्छा होऊन प्रभु रामचंद्र कोणाला कळणार नाहीं अशा गुप्तवेषानें नगरांतून फिरत होता. तेव्हां कोणी मनुष्य आपल्या स्त्रीला उद्देशून बोलत असलेले शब्द त्याच्या कानीं पडले ॥ ८ ॥ तो मनुष्य म्हणत होता ' तुला मी बाळगणार नाहीं, कारण तूं दुष्ट व्यभिचारिणी व परगृहीं वास करणारी आहेस. राम स्त्रीलंपट असल्यामुळें तो खुशाल सीतेला बाळगो; पण मी मात्र तसें करणार नाहीं ! ॥९॥ अज्ञानी लोकांचें समाधान करणें मोठें कठीण काम असतें. त्यांना वस्तुस्थिति काय आहे याची कल्पना नसते. नाना प्रकारचीं माणसें नाना प्रकारें बोलत असतात. अशा स्थितींत ऐकिलेल्या लोकापवादाला भिऊन पति रामचंद्रानें सीतादेवीचा त्याग केला व ती वाल्मीकीच्या आश्रमांत आली ॥ १० ॥ त्या वेळीं ती गरोदर होती. योग्य काळ आला असतां तिला दोन जुळे मुलगे झाले. ते पुढें लव आणि कुश म्हणून प्रसिद्ध झाले. त्यांचे जातकादि संस्कार वाल्मीकीनेंच केले ॥ ११ ॥ असो. लक्ष्मणाला अंगद आणि चित्रकेतु असे दोन मुलगे होते म्हणून सांगितलें

आहे. हे राजा, भरतालाहि तक्ष आणि पुष्कळ असे दोन मुलगे होते ॥ १२ ॥ सुबाहु आणि श्रुतसेन हे शत्रुघ्नाचे पुत्रा होत. दिग्विजयाच्या प्रसंगीं भरतानें पराक्रम करून कोट्यवधि गंधर्वांचा वध केला आणि त्यांचें सर्व द्रव्य आणून रामाच्या स्वाधीन केलें ॥ १३ ॥ शत्रुघ्नानेंहि तसाच पराक्रम केला. त्यानें मधुराक्षसाच्या लवणनामक पुत्राला मारून मधुवनांत मथुरा नांयाची नगरी बसविली ॥१४॥ असो. रामानें टाकून दिल्यामुळें वाल्मीकीच्या आश्रमांत राहिलेल्या सीतेनें आपले दोन्ही मुलगे त्या ऋषीच्या पदरांत घातले आणि रामाच्या चरणांचें ध्यान करीत तिनें पृथ्वीच्या विवरांत शिरून आपला अंत करून घेतला ॥ १५ ॥ तें ऐकून भगवान् रामचंद्राला फार दुःख झालें. तो तिचे निरनिराळे गुण आठवून रडूं लागला आणि विचारानें दुःख आवरण्याचा प्रयत्न करीत असतांहि त्या राजाला तें आवरतां आलें नाहीं ॥ १६ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे राजा, याप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या प्रेमाचा संबंध म्हणजे नित्य दुःख उत्पन्न करणाराच असतो. रामासारख्या समर्थांनाहि जर यामुळें दुःख होतें; तर घरादारांत गुरफटून गेलेल्या सामान्य माणसांची कथा काय ! ॥ १७ ॥ सीतेचा अंत झाल्यावर रामानें ब्रह्मचर्यव्रत स्वीकारिलें आणि तेरा हजार वर्षेपर्यंत या प्रभूनें अग्निहोत्रव्रताचें सतत पालन केलें ॥ १८ ॥ मग आपलें नित्य स्मरण करणाऱ्या भक्तांच्या हृदयांत दंडकारण्यांतील कांट्यांनीं टोचिलेलीं आपलीं चरणकमलें स्थापून रामप्रभु आपल्या तेजांत विलीन झाला ॥१९॥ प्रभु रामचंद्रानें हें मनुष्यरूप देवांच्या विनंतीवरून लीलेसाठीं घेतलें होतें. त्याच्या तेजाहून अधिक तेज कोणाचें नाहींच पण त्याशीं समान असाहि कोणी मिळावयाचा नाहीं. अशा प्रभु रामचंद्रानें शस्त्राच्या साहाय्यानें राक्षसांचा वध केला किंवा समुद्रावर सेतु बांधिला हा त्याचा मोठा पराक्रम समजून कवि त्याची कीर्ति गातात; पण ही कसली कीर्ति ? त्या सर्वसमर्थ प्रभूला शत्रुवधाच्या कार्यांत वानरांचें साह्य पाहिजे होतें असें का समजावयाचें ? ॥ २० ॥ त्यांचें निर्मळ यश सर्व पापांचा नाश करणारें असून दिग्गजांच्या अंगावरील भरजरी झुलीप्रमाणें तें जगाला शोभवीत आहे व राजाच्या सभांमध्यें अजूनहि मुनिजन तें गात असतात. प्रभु रामचंद्राच्या चरणकमलाची सेवा स्वर्गींचे देव आणि पृथ्वीवरील राजे हे आपल्या मुकुटमंडित मस्तकांनीं करीत असतात. अशा त्या रघुकुलनायकाला मी शरण जातों ॥ २१ ॥ त्या कोशलदेशांतील प्रजेपैकीं ज्यांचा म्हणून प्रभुरामचंद्राशीं यत्किंचित् संबंध आला; म्हणजे ज्यांनीं त्याच्या अंगाला स्पर्श केला, त्याचें दर्शन घेतलें, त्याला आसन दिलें किंवा ज्यांनीं त्याचें अल्पहि अनुकरण केलें, ते सर्व लोक योगीजनांना जें स्थान प्राप्त होतें, त्याच उत्तम स्थानाला पोंचले ॥ २२ ॥ शुकाचार्य परीक्षिताला सांगतात,—हे राजा, मनुष्य दयाधर्मांत निमग्न असतां तो जर रामाचें हें चरित्र कानांनीं ऐकेल, तर तो सर्व कर्मांच्या बंधनापासून मुक्त होतो ॥ २३ ॥

एवढें ऐकिल्यावर परीक्षितानें प्रश्न केला,–हे शुकमुने, त्या भगवान् रामचंद्रानें स्वतः आपल्या भावांशीं कसें वर्तन केलें, तसेंच त्याचे भाऊ त्याशीं कसे वागत आणि त्याची प्रजा व नागरिक हेहि आपल्या त्या राजाशीं कसें वर्तन करीत हें मला सांगा ॥ २४ ॥

शुकाचार्य म्हणाले,—हे राजा, सिंहासनावर अधिष्ठित झाल्यानंतर प्रथम त्रिभुवनेश्वर अशा रामचंद्रानें दिग्विजय करण्याची आपल्या बंधूंना आज्ञा दिली आणि आपले सेवकगण समागमें घेऊन प्रजेला दर्शन देण्यासाठीं तो अयोध्या पाहाण्याच्या मिषानें निघाला ॥ २५ ॥ त्या वेळीं त्या नगरींतील रस्ते चंदनाच्या पाण्यानें आणि हत्तींच्या मदजलानें शिंपिले होते. त्यामुळें आपला राजा आपल्यास भेटावयास आलेला पाहून ती हर्षानें भरून गेल्यासारखी दिसत होती ॥ २६ ॥ त्या नगरींतील वाडे, वेशी, सभागृहें, देवालयें इत्यादि ठिकाणीं सुवर्णकलश ठेविल्यामुळें व तेथें पताका लाविल्यामुळें तिला विशेष शोभा आली होती ॥ २७ ॥ ठिकठिकाणीं सुपाऱ्यांचे व केळ्यांचे घड असलेल्या पोफळी, केळी, रेशमी झालरी, आरसे, किनखापी छतें, पुष्पमाळा इत्यादिकांचीं सुंदर तोरणें उभारलीं होतीं ॥२८॥ प्रभु रामचंद्र याप्रमाणें नगर पाहावयास निघाला असतां नागरिक लोक हातांत भेटीचे पदार्थ घेऊन त्याला ठिकठिकाणीं सामोरे आले आणि त्याचें कल्याण चिंतून त्याला म्हणाले,—हे प्रभो रामचंद्रा, पूर्वीं तूंच या पृथ्वीचा उद्धार केलांस, तरी आतां तूंच हिचें रक्षण कर ॥२९॥ फार दिवसांनीं आपला राजा पाहावयास मिळणार म्हणून त्याचें दर्शन घडावें यास्तव नगरींतील स्त्रीपुरुष आपली प्रत्यहींचीं गृहकृत्यें सोडून आपल्या घरांच्या गच्च्यांवर आले आणि रामराजावर त्यांनीं फुलें उधळलीं. तेथून त्या कमलनेत्र प्रभूला कितीहि पाहिलें तरी त्यांच्या डोळ्यांची तृप्ति झाली नाहीं ॥३०॥ याप्रमाणें नगर पाहून झाल्यावर प्रभु रामचंद्रानें आपल्या राजवाड्यांत प्रवेश केला. त्या राजवाड्याचा उपभोग त्याच्या अनेक पूर्वजांनीं घेतला असून, अनंत जातींच्या द्रव्यांचीं भांडारें त्यांत भरलेलीं होतीं व त्यांतील सर्व प्रकारचें साहित्य अत्यंत मूल्यवान् होतें ॥ ३१ ॥ त्यांतील उंबरठे व द्वारें यांवर पोंवळीं बसविलेलीं असून खांबांवर वैदूर्यमण्यांचा जडाव केला होता, त्यांतील भूमि पाचूच्या खड्यांनीं केलली असून अगदीं स्वच्छ ठेविली होती, आणि त्याच्या भिंती तेजस्वी संगमरवरी दगडांच्या बांधिल्या होत्या ॥ ३२ ॥ त्यांत सर्वत्र चित्रविचित्र पुष्पमाळा व झालरी लाविल्या असून हंड्याझुंबरांतील रत्नांचे किरण सर्वत्र फांकले होते व चैतन्याप्रमाणें उज्ज्वल अशीं मोतीं आणि सुंदर अशा दुसऱ्या अनेक उपभोगाच्या साधनांचा संग्रह केलेला होता ॥ ३३ ॥ सुवासिक पदार्थ व अत्तरांचे दिवे यांनीं त्या वाड्याला शोभा आलेली होती आणि त्यांतील स्त्रीपुरुषांनीं फुलांच्या माळांनीं शरीरें अलंकृत केलीं असल्यामुळें तीं देवांसारखीं दिसत होतीं. ती सर्व स्वभावतःच सुंदर स्वरूपाचीं होतीं व त्यामुळें त्यांच्या अंगांवरील अलंकारांनाच त्यामुळें शोभा आली होती ॥ ३४ ॥ अशा प्रकारच्या त्या आपल्या वाड्यांत राहून आत्मस्वरूपांत रममाण होणारा ज्ञानी पुरुषांचा प्रभु असा रामचंद्र अत्यंत प्रेमळ आणि आवडत्या अशा प्रिय सीतेसह विलासोपभोग घेत असे ॥३५॥ त्यानें शेंकडों वर्षें यथाप्रसंग विषयाचा उपभोग घेतला; पण धर्माशीं त्यानें कधींहि विरोध केला नाहीं. त्यामुळें त्याची प्रजा त्याच्या चरणकमलाचें नित्य ध्यान करीत असे ॥ ३६ ॥

**अकरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १२ वा

शुकाचार्य सांगतात,–हे परीक्षित्राजा, रामाच्या पुत्रांपैकीं एक जो कुश त्याला अतिथि नांवाचा पुत्र होता. अतिथीचा पुत्र निषध आणि निषधाचा नभ. नभाच्या पुत्राचें नांव पुंडरीक असून त्याला क्षेमधन्वा नांवाचा पुत्र झाला ॥ १ ॥ क्षेमधन्व्यापासून देवानीक आणि देवानीकापासून पारियात्र झाला. पारियात्राचा पुत्र बल आणि बलाचा स्थल होय. या बलाला पुढें सूर्याच्या अंशापासून वज्रनाभनामक पुत्र झाला ॥ २ ॥ वज्रनाभाला खगणनामक * पुत्र होता व खगणाचा विधृति हा होता. पुढें विधृतीपासून हिरण्यनाभ झाला. हा जैमिनिमुनीचा शिष्य असून योगनिष्णात होता. या हिरण्यनाभापासूनच कोशलदेशांतील याज्ञवल्क्यनामकऋषीनें अनेक सिद्धि देणाऱ्या आणि हृदयांतील अज्ञानाची गांठ तोडून टाकणाऱ्या अध्यात्मयोगाचें ज्ञान संपादन केलें ॥ ३ ॥ ४ ॥ हिरण्यनाभाला पुष्य नांवाचा पुत्र असून पुष्याचा पुत्र ध्रुवसंधि हा होता. ध्रुवसंधीनंतर सुदर्शन, अग्निवर्ण आणि शीघ्र अशा पिढ्या क्रमानें झाल्या.शीघ्राचा पुत्र मरु हा होय ॥ ५ ॥ मरूनें योगसिद्धि प्राप्त करून घेतली असून सांप्रत तो कलाप नांवाच्या गांवीं राहात आहे. कलियुगाच्या शेवटीं सूर्यवंश नष्ट होईल, त्या वेळीं हा मरुच त्याचें पुनरुजीवन करील ॥ ६ ॥ मरूला प्रसुश्रुत नांवाचा पुत्र असून प्रसुश्रुताचा संधि व संधीचा अमर्षण होय. अमर्षणाला पुत्र झाला त्याचें नांव महस्वान्. महस्वानापासून विश्वासाह्याची उत्पत्ति झाली ॥ ७ ॥ पुढे विश्वासाह्यापासून प्रसेनजित व प्रसेनजितापासून तक्षक होईल. तक्षकाचा बृहद्बल. हे राजा, तुझ्या पित्यानें या बृहद्बलाचा युद्धांत वध केला ॥ ८ ॥ इतके राजे इक्ष्वाकूच्या वंशांत आजवर होऊन गेले. आतां यापुढें होणारे राजे सांगतों ते ऐक. बृहद्बलाला बृहद्रण नांवाचा पुत्र होईल ॥ ९ ॥ बृहद्रणापासून उरुक्रिय व उरुक्रियापासून वत्सवृद्ध होईल. वत्सवृद्धापासून प्रतिव्योम व त्याच्या मागून भानु, दिवाक आणि वाहिनीपति असे होतील ॥ १० ॥ वाहिनीपतीनंतर सहदेव आणि त्यानंतर पराक्रमी बृहदश्व व भानुमान् असे होतील. भानुमानाला प्रतीकाश्वनामक पुत्र होऊन प्रतीकाश्वाला सुप्रतीक हा पुत्र होईल ॥ ११ ॥ त्याच्या नंतर मरुदेव, सुनक्षत्र आणि पुष्कर राजे होऊन, पुष्करामागून त्याचा पुत्र अंतरिक्ष, अंतरिक्षपुत्र सुतपा आणि सुतप्याचा पुत्र अमित्रजित् असे होतील ॥ १२ ॥ पुढें अमित्रजिताचा पुत्र बृहद्राज, बृहद्राजाचा बर्हि आणि बर्हीचा कृतंजय असे राजे होणार आहेत. रणंजय हा कृतंजयाचा पुत्र व रणंजयाचा संजय ॥ १३ ॥ संजयानंतर शाक्य, नंतर शुद्धोद आणि शुद्धोदाचा पुत्र लांगल असे राजे होतील.

* याचें नांव शंखवण असें आंध्रप्रतींत आढळतें.

लांगलामागून प्रसेनजित् आणि त्यानंतर क्षुद्रक नांवाचा राजा होईल ॥१४॥ क्षुद्रकानंतर त्याचा पुत्र सुरथ आणि सुरथाचा पुत्र सुमित्र नांवाचा होऊन बृहद्बलाच्या वंशांतील राजांची समाप्ति होईल ॥ १५ ॥ हे परीक्षित्‌राजा, याप्रमाणें इक्ष्वाकुवंश सुमित्रापर्यंतच चालून कलियुगांत त्याचा खरोखर शेवट होणार आहे ॥ १६ ॥

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

शुकाचार्य म्हणतात,—हे परीक्षित्‌राजा, इक्ष्वाकूचा दुसरा पुत्र जो निमि, त्यानें यज्ञाला आरंभ केला आणि वसिष्ठाची ऋत्विज् म्हणून योजना केली. पण वसिष्ठ त्याला म्हणाला,–बा निमे, इंद्रानें आपल्या यज्ञासाठीं मला पूर्वीच निमंत्रण दिलेलें आहे. यास्तव मीं त्याचा तो यज्ञ पुरा करून येतों. तेथपर्यंत माझी वाट पाहा. हें ऐकून निमि स्वस्थ राहिला आणि वसिष्ठ इन्द्राच्या यज्ञासाठीं निघून गेला ॥ १ ॥ २ ॥ पण वाट किती पाहावी, जीवित क्षणभंगुर आहे, असें जाणून आत्मज्ञानी निमीनें दुसऱ्या ऋत्विजांची योजना करून यज्ञाला आरंभ केला. कारण गुरु लवकर येण्याचें चिन्ह दिसेना ॥ ३ ॥ पुढें इंद्राचा यज्ञ समाप्त झाल्यावर वसिष्ठ परत आला आणि निमीनें वचन मोडून यज्ञाला आरंभ केल्याचें पाहाताच त्या अपराधाबद्दल त्यानें निमिला शाप दिला. तो म्हणाला,—हा निमि आपल्याला मोठा ज्ञानी समजतो, तरी याच्या देहाला मृत्यु येवो ॥ ४ ॥ हा शाप ऐकून गुरूनें अधर्म केला आहे असें निमीला वाटलें आणि त्यानें वसिष्ठाला उलट शाप दिला. तो वसिष्ठाला म्हणाला,–'ज्या अर्थी धर्माचा विचार न करतां लोभानें तूं वागलास त्या अर्थी तुझा सुद्धां देह पतन पावो !' ॥ ५ ॥ असें बोलून आत्मज्ञानी निमीनें आपला देह सोडिला. इकडे वसिष्ठानेंहि तो देह सोडून मित्रावरुणापासून उर्वशीच्या पोटीं जन्म घेतला ॥ ६ ॥ निमीचा देह पडल्यावर श्रेष्ठ ऋषींनीं तो सुगंधी द्रव्यांत ठेवून त्याचें रक्षण केलें आणि यज्ञ समाप्त झाल्यावर तेथें जमलेल्या देवांना ते म्हणाले, ॥७॥ हे देव हो, तुम्ही जर प्रसन्न झाला असाल, तर राजाचा हा देह पुनः सजीव होवो.' ऋषींची विनंती ऐकून देव 'ठीक आहे' असें म्हणाले. पण निमीच म्हणूं लागला, मला आतां हें देहाचें बंधन न होईल तर बरें ॥ ८ ॥ या देहाचा केव्हां वियोग होईल हें ठाऊक नाहीं व या भयामुळेंच त्याची इच्छा न करतां, मुनि भगवान् विष्णूच्या चरणकमलाचा आश्रय करितात ॥ ९ ॥ देहापासून दुःख, संकटें आणि अनर्थ यांचीच प्राप्ति होत असल्यामुळें आतां तो धारण करण्याची माझी इच्छा नाहीं. माशांना ज्याप्रमाणें पाण्यांत जिकडेतिकडे मृत्यु असतो, त्याप्रमाणेंच देहालाहि सगळीकडून त्याची भीति असते ॥ १० ॥ हें निमीचें भाषण ऐकून देव म्हणाले,–ऋषि हो, निमिच्या म्हणण्याप्रमाणें होवो. ह्याला शरीर धारण न करितांच प्राण्यांच्या नेत्रांत खरोखर राहूं दे. हा अंतर्यामिरूपानें डोळ्यांत राहिला असतां त्याचें तेथील अस्तित्व पापण्यांच्या उघडझाकीमुळें कळून येईल ॥ ११ ॥ याप्रमाणें झालें असतां राजरहित देश झाल्यामुळें लोकांवर संकटें येतील असा विचार करून तेथें जमलेल्या थोर ऋषींनीं निमीच्या मृत देहाचें मंथन केलें व त्या मंथनापासून एक पुत्र निर्माण झाला ॥ १२ ॥ अशा विलक्षण रीतीनें या मुलाचा जन्म झाल्यामुळें त्याला जनक असें म्हणूं लागले. तसें निमि हा विदेह स्थितींत असतां त्याच्यापासून झाल्यामुळें वैदेह आणि मंथनापासून झाल्यामुळें मिथिल अशीं

आणखीहि नांवें त्याला मिळालीं. त्यानें मिथिलानगरी वसविली॥१३॥ या जनकाला उदावसु नांवाचा पुत्र होता व उदावसूचा पुत्र नन्दिवर्धन. नंदिवर्धनापासून सुकेतु झाला व सुकेतूला पुढें देवरात ॥ १४ ॥ देवतारापासून बृहद्रथाचा जन्म झाला आणि बृहद्रथापसून महावीर्य झाला.महावीर्याचा पुत्र सुधृती,सुधृतीचा धृष्टकेतु,धृष्टकेतूचा हर्यश्व आणि हर्यश्वाचा मरु झाला ॥ १५ ॥ मरूपासून प्रतीपकाचा जन्म झाला. प्रतीपकापासून कृतिरथ झाला, कृतिरथापासून देवमीढ, देवमीढापासून विसृत आणि विसृतापासून महाधृति झाला ॥ १६ ॥ महाधृतीनंतर कृतिरात आणि कृतिरातापसून त्याचा महारोमा झाला. महारोमाचा पुत्र स्वर्णरोमा आणि त्यापासून ह्स्वरोमाचा जन्म झाला ॥ १७ ॥ ह्स्वरोमाचा पुत्र सीरध्वज होय. हा यज्ञासाठीं भूमि नांगरीत असतां त्याच्या नांगराच्या फाळापासून सीतेची उत्पत्ति झाली. याप्रमाणें सीर म्हणजे नांगर हा त्याच्या कीर्तीचा ध्वज झाल्यामुळें त्याला सीरध्वज म्हणतात. ॥ १८ ॥ या सीरध्वजाचा पुत्र कुशध्वज व कुशध्वजाचा धर्मध्वज होय. धर्मध्वजाला कृतध्वज आणि मितध्वज असे दोन पुत्र होते ॥ १९ ॥ त्यांत कृतध्वजाला केशिध्वज हा पुत्र झाला आणि मितध्वजाला खाण्डिक्य हा झाला. कृतध्वजाचा पुत्र केशिध्वज हा आत्म-विद्येत निष्णात होता ॥ २० ॥ खाण्डिक्य कर्ममार्गाचें तत्त्व उत्तम प्रकारें जाणणारा असून केशिध्वजाच्या भीतीनें त्याला पळून जावें लागलें. खाण्डिक्याला भानुमान् नांवाचा पुत्र असून भानुमानाला शतद्युम्नानांवाचा पुत्र होता ॥२१॥ शतद्युम्नाचा पुत्र शुचि. शुचीला सनद्वाज हा पुत्र झाला आणि सनद्वाजाला ऊर्ध्वकेतु झाला.ऊर्ध्वकेतूचा पुत्र अज व अजाचा पुरुजित् होय ॥ २२ ॥ पुरुजिताचा पुत्र अरिष्टनेमि अरिष्टनेमीचा श्रुतायु. श्रतायूपासून सुपार्श्वक जन्मला. सुपार्श्वकानंतर त्याचा पुत्र चित्ररथ आणि चित्ररथाचा क्षेमर्धि असे मिथिलेचे राजे झाले ॥ २३ ॥ क्षेमर्धीमागून समरथ झाला व समरथाचा पुत्र सत्यरथ होय. सत्यरथापासून उपगुरु आणि उपगुरूपासून अग्नीच्या अंशानें उपगुप्ताचा जन्म झाला ॥ २४ ॥ त्यानंतर उपगुप्ताचा वस्वनंत, वस्वनंताचा युयुध आणि युयुधाचा सुभाषण असे पुत्र होते. सुभाषणांपासून श्रुत झाला, श्रुतापासून जय,जयापासून,विजय,विजयापासून ऋत अशा पिढ्या झाल्या ॥ २५ ॥ ऋताचा पुत्र शुनक होय. शुनकापासून वीतहव्य या पुत्राची उत्पत्ति झाली व वीतहव्यापासून धृति झाला. त्या धृतीपासून बहुलाश्व जन्मला, बहुलाश्वा-पासून कृतिनामक पुत्र झाला आणि कृतीला महावशी हा पुत्र झाला ॥ २६ ॥ शुकाचार्य सांगतात,—हे परीक्षित्राजा, हे सर्व मिथिलेचे राजे अध्यात्मविद्येंत पूर्ण निष्णात होते व त्यामुळें जरी त्यांनीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला होता, तथापि योगेश्वर याज्ञवल्क्य-मुनीच्या कृपेनें ते सुखदु:खादि द्वंद्वापासून अलिप्त राहिले ॥ २७ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १४ वा

शुकाचार्य म्हणतात,—हे परीक्षितराजा, आतां यापुढें मी तुला पवित्र अशा सोमवंशाचा वृत्तात सांगतों तो ऐक. या वंशामध्यें इलेचा पुत्र पुरूरवा आणि त्याच्यानंतर झालेले अनेक पुण्यकीर्ति राजे यांचें वर्णन केलें आहे ॥ १ ॥ सहस्त्र मस्तकांनीं युक्त अशा भगवान् आदिपुरुष विष्णूच्या नाभिसरोवरांतून निघालेल्या कमळांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाला. ब्रह्मदेवाचा पुत्र अत्रि हा गुणांनीं अगदीं आपल्या पित्यासारखा होता ॥ २ ॥ अत्रीच्या डोळ्यांपासून खरोखर अमृतस्वरूपी असा पुत्र जन्मला. त्याला सोम म्हणतात. या सोमाला ब्रह्मदेवानें ब्राह्मण, औषधि व आकाशांतील नक्षत्रें यांचें आधिपत्य दिलें ॥ ३ ॥ सोमानें तिन्ही लोक जिंकून राजसूय यज्ञ केला आणि गर्वानें उन्मत्त होऊन बृहस्पतीच्या तारानामक पत्नीला बलात्कारानें पळवून नेलें ॥ ४ ॥ बृहस्पतीनें पत्नी परत दे म्हणून त्याची अनेकवार विनवणी केली; परंतु तो मदोन्मत्त झाल्यामुळें तारेला सोडिता झाला नाहीं. तेव्हां त्याकरितां देवदानवांमध्यें युद्ध झालें ॥ ५ ॥ शुक्राचें बृहस्पतीशीं वैर असल्यामुळें तो आपले सर्व असुर-शिष्य घेऊन चंद्राकडे साहाय्य करावयास गेला आणि आपल्या गुरूच्या पुत्रावर संकट आलें म्हणून सर्व भूतगणांसमवेत शंकरानें प्रेमास्तव बृहस्पतीचा पक्ष धरिला ॥ ६ ॥ अर्थात् स्वर्गाधिपति इन्द्र आपलें सर्व देवसैन्य घेऊन गुरूची पाठ राखावयास आला. याप्रमाणें तारेच्या प्राप्तीसाठीं भयंकर युद्ध होऊन त्यांत देवदानवांची फार प्राणहानि झाली ॥ ७ ॥ शेवटीं अंगिरा-ऋषीच्या विनंतीवरून ब्रह्मदेवानें सोमाकडे जाऊन त्याची निंदा केली व तारेला तिच्या पतीकडे परत आणून दिलें. तारा त्या वेळीं गरोदर होती. बृहस्पतीला ही गोष्ट समजली तेव्हां तो तिला म्हणाला, हे दुर्बुद्धि स्त्रिये, तूं माझें क्षेत्र असतां तुझ्या ठिकाणीं इतरांनीं गर्भाची स्थापना केली आहे. यास्तव या गर्भाचा तूं लवकर त्याग कर. तूं माझी स्त्री असून मला संततीची इच्छा आहे. मी तुला जाळून भस्म करीन अशी भीति बाळगूं नको ! ॥ ८ ॥ ९ ॥ पतीचें हें भाषण ऐकून तारेला लज्जा उत्पन्न झाली व सोन्यासारख्या तेजस्वी अशा भर्गस्थ कुमाराचा तिनें त्याग केला. त्या कुमाराला पाहून बृहस्पति आणि सोम या दोघांनाहि तो आपल्याला असावा अशी इच्छा झाली ॥ १० ॥ हा कुमार माझा पुत्र होय, तुझा नव्हे ! असें मोठ्यानें ओरडून ते भांडूंहि लागले. हा कुमार खरोखर कोणाचा असें ऋषि व देव यांनीं तारेला विचारिलें; पण लाजेमुळें तिनें कांहीं उत्तरच दिलें नाहीं ॥ ११ ॥ तेव्हां तो कुमार रागावला आणि मातेला म्हणाला, हे दुष्ट, खोटी लज्जा धारण करून तूं आतां बोलत नाहींस तें कां ? तुझें निंद्य कृत्य काय असेल तें मला लवकर सांग ॥ १२ ॥ तारा लाजेमुळें चार जणांत कांहींच उत्तर देत नाहीं हें पाहून ब्रह्मदेवानें तिला एकीकडे नेऊन व धीर देऊन विचारिलें. तेव्हां हा पुत्र सोमाचा होय असें तिनें हळूच उत्तर दिलें

व त्याप्रमाणें सोमानें त्याचा स्वीकार केला ॥ १३ ॥ शुकाचार्य परीक्षितीला सांगतात,– हे राजा, मग ब्रह्मदेवानें त्या मुलाचें बुध असें गंभीरपणें नांव ठेविलें आणि त्या पुत्राला पाहून सोमाला मोठा आनंद झाला ॥ १४ या बुधापासून पुढें इलेच्या पोटीं पुरूरव्याची उत्पत्ति झाली, हें पूर्वी सांगितलेंच आहे. हा पुरूरवा रूपवान्, गुणी, उदार, शीलवान्, धनवान् आणि मोठा पराक्रमी होता ॥ १५ ॥ त्याचे हे गुण नारद ऋषीनें इंद्राच्या राजसभेंतहि वर्णन केले. ते ऐकून तेथील उर्वशीनामक अप्सरेला त्याच्याविषयीं अभिलाष उत्पन्न होऊन कामानें ती अगदीं विह्वल झाली ॥ १६ ॥ तिला पूर्वी मित्रावरुणांचा शाप होऊन मनुष्यलोकीं यावयाचें होतेंच. तेव्हां हा पुरूरवा श्रेष्ठ मनुष्य असून मूर्तिमंत मदनच आहे असें ऐकिल्यावर तिला बरें वाटलें व धीर करून ती सुंदर अप्सरा त्याच्याजवळ गेली ॥ १७ ॥ तिला पाहतांच पुरूरवा राजाला मोठा आनंद झाला व त्याचे डोळे फुललेल्या फुलासारखे टवटवीत झाले. त्याच्या अंगावर रोमांचहि उभे राहिले आणि गोड शब्दांनीं तो त्या अप्सरेशीं बोलूं लागला ॥१८॥ पुरूरवा म्हणाला,–हे सुंदरि, ये. तुझें मीं स्वागत करतों. या आसनावर बस. तुझी कोणती इच्छा मी पुरी करूं? तूं माझ्या समागमें क्रीडा कर. आपलें उभयतांचें प्रेम निरंतर कायम राहो ॥१९॥

राजाचें हें भाषण ऐकून उर्वशीनें उत्तर केलें,– हे सुंदर पुरुषा, कोणत्या स्त्रीचें मन व दृष्टि हीं तुझ्यावर गेलीं असतां तेयें आसक्त होणार नाहींत बरें? तुझ्या वक्षःस्थलाकडे मन व दृष्टि हीं एकदां गेलीं म्हणजे तेथेंच क्रीडा करावी असें वाटून तीं तेथून हालतच नाहींत ॥ २० ॥ हे राजा, हीं माझीं दोन कोंकरें आहेत. तूं माझा सन्मान केला आहेस, यास्तव हीं मी तुझ्याजवळ ठेव म्हणून ठेवितें. तूं यांचें रक्षण कर. मी तुझ्या समागमांत रममाण होईन. कारण स्त्रियांना जो प्रशंसनीय वाटतो, तोच त्यांचा पति होय ॥ २१ ॥ हे राजा, मात्र माझ्या दोन अटी पाळल्या पाहिजेत. मी केवळ तूपच खाऊन राहीन आणि रतिप्रसंगाशिवाय इतर कोठेंहि तुला नग्न अवस्थेंत पाहाणार नाहीं ! उर्वशीच्या या दोन्ही अटी पाळण्याचें त्या थोर मनाच्या पुरूरव्यानें मान्य केलें ॥ २२ ॥ तो म्हणाला,– काय हो हिचें मनुष्याला मोहून सोडणारें रूप ! आणि हिचें प्रेम तरी किती ! हे अप्सरे, तूं आपण होऊन आलेली असतां तुझा स्वीकार करणार नाहीं असा कोण मनुष्य असणार? ॥ २३ ॥ अशा प्रकारें ती उर्वशी त्याचें मन त्याच्या इच्छेप्रमाणें रमवूं लागली असतां तो नरश्रेष्ठ पुरूरवा चैत्ररथ आदिकरून देवांच्या मनोहर क्रीडावनांत जाऊन यथेच्छ विहार करूं लागला ॥ २४ ॥ त्या अप्सरेच्या अंगाला कमळांच्या परागांसारखा सुगंध येत असे. पुरूरवा तिच्यासह क्रीडा करीत असतां तिच्या मुखापासून निघणाऱ्या सुगंधानें अगदीं मोहून जाई. अशा रीतीनें त्यानें किती तरी दिवस आनंदांत घालविले ॥ २५ ॥ इकडे स्वर्गलोकीं उर्वशीची भेट न झाल्यामुळें इंद्राला करमेनासें होऊन तो गंधर्वांना म्हणाला, 'उर्वशी नसल्यामुळें हें माझें सभागृह कसें उदास दिसत आहे ! ॥ २६ ॥ इंद्रानें असें म्हटलें असतां त्याचा आशय जाणून ते गंधर्व तेथून निघाले आणि मध्यरात्रीच्या वेळीं काळोख पडला असतां पुरूरव्याजवळ येऊन उर्वशीनें राजापाशीं ठेव म्हणून राखावयास

दिलेलीं कोंकरें त्यांनीं पळवून नेलीं ॥ २७ ॥ गंधर्व कोंकरांना घेऊन चालले असतां तीं ओरडूं लागलीं. व तें ऐकून उर्वशी दुःख करूं लागली. ती म्हणाली,–'अरेरे, या दुबळ्या पतीच्या नादानें माझा घात झाला. हा आपल्याला वीर म्हणून समजतो; पण खरोखर हा नपुंसक आहे. याच्यावर विश्वासून राहिल्यामुळें माझा नाश झाला व माझीं पोरासारखीं कोंकरें चोरांनीं पळविलीं! अहो, हा आपल्याला पुरुष म्हणवितो, पण स्त्रियांप्रमाणें रात्रंदिवस भीतीनें झोंपून राहतो! ॥२८॥२९॥ याप्राणें उर्वशीनें कठोर शब्दांनीं डिवचिलें असतां अंकुशानें टोंचिलेल्या हत्तीप्रमाणें पुरूरवा राजा एकाएकीं शयानावरून उठला आणि तरवार घेऊन त्या रात्रीं नग्नावस्थेंतच चोरांच्या मागून धावूं लागला ॥ ३० ॥ तेव्हां त्या गंधर्वांनीं दोन्हीं कोंकरांना तेथेंच सोडिलें आणि आपल्या विशिष्ट तेजानें तेथें प्रकाश पाडिला. आणि कोंकरें घेऊन पुरूरवा परत येत असतां त्या प्रकाशांत तो नग्नस्थितींतच उर्वशीच्या दृष्टीस पडला ॥ ३१ ॥ तेव्हां ठरल्याप्रमाणें उर्वशी शयनावरून उठून निघून गेली. पुरूरवा शयनस्थानीं येऊन पाहातो तों आपली पत्नी तेथें नाहीं हें पाहून तो दुःखित झाला. त्याचें सारें लक्ष उर्वशीकडे असल्यामुळें तो विह्वळ झाला आणि दुःख करीत वेड्यासारखा इकडेतिकडे हिंडूं लागला ॥ ३२ ॥ हिंडतां हिंडतां कुरुक्षेत्रांत तो आला असतां सरस्वतीनदीच्य कांठीं उर्वशी आपल्या पांच मैत्रिणींसह त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहून पुरूरवा आनंदित झाला आणि तिला गोड शब्दांनीं म्हणाला ॥३३॥ 'हे प्रिये, उभी राहा. तूं मला अद्यापि सुखी केलें नाहींस. यास्तव मला संकटांत टाकून जाणें हें तुला योग्य नाहीं. आपण गोष्टी बोलूं या ॥ ३४ ॥ हे अप्सरे, तूं हा माझा देह दूर ओढून आणिला असून तो आतां अगदीं पडण्याच्या बेतांत आला आहे. इंद्रियरूपी लांडगे व गिधाडें याला खाऊन टाकीत आहेत. खरोखर हा तुझ्या अवकृपेला पात्र नाहीं'॥३५॥ राजाचें भाषण ऐकून उर्वशीनें उत्तर केलें, 'हे राजा, अरे, तूं पुरुष आहेस ना? मग मरेन असें कां म्हणतोस? या लांडग्यागिधाडांना आपला देह खाऊं देऊंच नको. इतका विषयासक्त कशाला होतोस? अरे, लांडग्यांना जसें कधीं हृदय नसतें, तसें स्त्रियांना सत्य हे खरोखर ठाऊक नसतें ॥ ३६ ॥ स्त्रिया खरोखर दुष्ट व क्रूर असतात. त्यांना सहन करणें कठीण असतें. आपल्या आवडीसाठीं त्या वाटेल तें धाडस करितील. अगदीं अल्प गोष्टीसाठीं सुद्धां त्या विश्वास दाखवून आपल्या पतीचा किंवा भावाचाहि घात करितील ॥ ३७ ॥ स्वैर आचरण करणाऱ्या या व्यभिचारी स्त्रिया अज्ञानी लोकांना खोटा विश्वास दाखवून पुढें प्रेमाचें सोंग फेंकून देतात आणि नव्या नव्या पुरुषाची इच्छा करितात ॥ ३८ ॥ हे राजा, यापुढें वर्षाच्या शेवटीं मात्र एकदां तुला माझा सहवास घडेल आणि तुला आणखी पुत्रहि होतील ॥ ३९ ॥ उर्वशीचें भाषण ऐकून तिचा आशय राजाला समजला आणि तो गरोदर आहे असें पाहून तो आपल्या नगरीला परत आला. मग वर्ष संपल्यावर पुनः तो चैत्ररथ वनांत गेला असतां उर्वशीला सुंदर व पराक्रमी पुत्र झाला आहे असें त्याला आढळून आलें ॥ ४० ॥ याप्रमाणें तिची भेट झाली असतां पुरूरव्याला हर्ष झाला आणि ती रात्र तो तिच्या समागमें राहिला. नंतर पुनः विरह होणार म्हणून राजा

दीन वदन झाला असतां उर्वशी म्हणाली ॥ ४१ ॥ 'राजा, या गंधर्वांची तूं आराधना कर; म्हणजे ते तुला माझें दान करितील. पुरूरव्यानें त्याप्रमाणें केलें असतां गंधर्वांनीं संतुष्ट होऊन त्याला एक अग्नीची थाळी दिली. शुकाचार्य परीक्षिताला सांगतात,—— हे राजा, पुरूरव्याला थाळी मिळाली असतां तीच उर्वशी होय असें तो मानूं लागला; पण बनांत फिरत असतां आपली चूक त्याला समजली ॥४२॥ तेव्हां ती थाळी तेथें बनांतच टाकून तो घरीं आला आणि रात्रौ ध्यान करूं लागला. त्या वेळीं त्रैतायुग चालू झालें होतें. ध्यान करतां करतां त्याच्या मनांत तीन वेद स्फुरूं लागले ॥ ४३ ॥ तेव्हां त्यानें ज्या बनांत थाळी टाकिली होती तेथें तो गेला असतां शमीवृक्षांतून निघालेला पिंपळ त्याच्या दृष्टीस पडला. त्यानें त्या पिंपळाच्या दोन अरणी काढिल्या आणि उर्वशीचा लोक आपल्याला मिळावा म्हणून त्या अरणींचें एकमेकींवर घर्षण केलें ॥ ४४ ॥ त्याच्या मनांत वेदमंत्रांचें स्फुरण झालें होतें. त्यांना अनुसरून खालची अरणी म्हणजे उर्वशी वरची म्हणजे आपण स्वत: आणि दोहोंच्यामध्यें उत्पन्न होणारा अग्नि म्हणजे आपला पुत्र असें त्यानें मनांत आणिलें ॥ ४५ ॥ त्यानें याप्रमाणें अरणींचें मंथन केलें असतां धन उत्पन्न करणारा अग्नि तेथें निर्माण झाला. तो तीन प्रकारचा होता व तीन वेदांच्या अनुरोधानें राजानें त्या अग्नींना आपले तीन पुत्र मानिलें ॥ ४६ ॥ मग त्या अग्नीच्या योगानें उर्वशीचा लोक प्राप्त व्हावा म्हणून त्यानें इंद्रियातीत व यज्ञाचा स्वामी अशा सर्वदेवस्वरूपी भगवान् श्रीहरीचें पूजन केलें ॥ ४७ ॥ पूर्वीं कृतयुगामध्ये सर्व वाणींचें बीज असा जो ॐकार तोच काय तो एक वेद होता. तसाच नारायण हा एकच देव असून अग्नि एकच होता व वर्ण सुद्धा एकच होता ॥ ४८ ॥ पण त्रेतायुगाचा आरंभ झाल्यावर पुरूरव्यापासून एका अग्नीचे तीन अग्नि झाले. हा जो पुरूरव्याचा अग्निरूप पुत्र त्याच्या साह्यानें त्या राजाला गंधर्वलोकाची प्राप्ति झाली ॥ ४९ ॥

## चौदावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १५ वा

शुकाचार्य सांगतात, –हे परीक्षित्‌राजा, पुरूरव्याला उर्वशीपासून सहा पुत्र झाले. त्यांचीं नांवें आयु, श्रुत्यायु, सत्यायु, रय, विजय आणि जय अशीं होतीं ॥ १ ॥ त्यांत श्रुतायूला बसुमान आणि सत्यायूला श्रुतंजय असे पुत्र होते. रयाच्या पुत्राचें नांव एक असें असून जयाच्या मुलाचें अमित असें होतें ॥ २ ॥ विजयाचा पुत्र भीम, भीमाचा कांचन आणि कांचनाचा होत्रक. होत्रकाला जन्हुनामक पुत्र होता. यानेंच गंगेचा एक घोट करून तिला पिऊन टाकिलें. जन्हूला पूरु नांवाचा पुत्र असून पूरुला बलाक आणि बलाकाला अजक असे पुत्र झाले ॥ ३ ॥ अजकाचा पुत्र कुश.कुशाला कुशाम्बु, मूर्तय, वसु आणि कुशनाभ असे चार पुत्र झाले. कुशांबूचा पुत्र गाधि हा होय ॥ ४ ॥ गाधीला सत्यवती नांवाची कन्या होती. तिला ऋचीकनामक भृगुकुलोत्पन्न ब्राह्मणानें मागणी घातली पण ऋचीक हा विजोड पति होईल असें समजून गाधि त्याला म्हणाला ॥ ५ ॥ हे ऋचीक मुने, आम्ही कुशाच्या वंशांस जन्मलेले आहोंत. आमची कन्या तुला पाहिजे असेल तर डाव्या उजव्या कानांपैकीं एकच कान ज्यांचा काळा आहे असे चंद्रासारखे शुभ्रवर्णाचे सहस्र घोडे तूं तिच्यासाठीं आम्हांला दिले पाहिजेस ॥ ६ ॥ गाधीनें याप्रमाणें सांगितलें असतां त्याचा अभिप्राय जाणून ऋचीक वरुणाकडे गेला आणि त्याच्याजवळून तसले तितके घोडे आणून त्यानें गाधीला दिले व त्याच्या सुंदर कन्येचें पाणिग्रहण केलें ॥ ७ ॥ मग एकदां त्याची पत्नी सत्यवती आणि सासु म्हणजे सत्यवतीची माता या दोघींनीं पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून त्याची प्रार्थना केली. तेव्हां दोघींसाठीं दोन प्रकारच्या मंत्रांनीं चरु शिजवून ऋचीकमुनि स्नान करावयास गेला ॥ ८ ॥ तो स्नानास गेला असतां इकडे सत्यवतीसाठीं शिजविलेला चरु श्रेष्ठ आहे असें समजून तिच्या मातेनें तो तिच्यापाशीं मागितला व सत्यवतीनें तो तिला देऊन मातेसाठीं शिजविलेला चरु आपण स्वतः भक्षण केला ॥९॥ मुनि स्नान करून परत आल्यावर त्याला हा प्रकार दिसला. तेव्हा तो आपल्या पत्नीला म्हणाला, तुझ्या हातून फारच अनिष्ट गोष्ट घडली. तुम्ही चरूचा विनिमय केल्यामुळें तुला जो पुत्र होईल तो भयंकर दण्डधारी असा होईल व तुझ्या मातेचा पुत्र मात्र ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा होईल. ॥ १० ॥ हें ऐकून सत्यवतीला वाईट वाटलें आणि असें होऊं नये म्हणून तिनें पतीची प्रार्थना केली. तेव्हां तो म्हणाला,–तुला पुत्र क्षत्रियवृत्तीचा नको असेल, तर नातु तसा होईल; पण चरूचा प्रभाव दिसणारच. ऋचीकाच्या सांगण्याप्रमाणें सत्यवतीला जमदग्नि झाला ॥ ११ ॥ पुढें ही सत्यवती कौशिकी नांवाची लोकांना पवित्र करणारी महापवित्र नदी झाली. जमदग्नीनें रेणूची कन्या रेणुका नांवाची होती तिच्याशीं विवाह केला ॥ १२ ॥ तिच्यापासून जमदग्नीला वसुमत् आदिकरून बरेच

पुत्र झाले. त्यांतील धाकटा राम नांवानें प्रसिद्ध झाला ॥ १३ ॥ तो भगवान् वासुदेवाचा अंश असून त्यानें हैहयकुलाचा नाश केला आणि ही पृथ्वीला एकवीस वेळा निःक्षत्रिय केली असें म्हणतात ॥ १४ ॥ क्षत्रिय दुष्ट होऊन पृथ्वीला भारासारखे झाले, ब्राह्मणांचा द्वेष करूं लागले आणि रजोगुण आणि तमोगुण यांनीं भरून गेले त्या वेळीं लहानसा अपराध पाहूनहि त्यानें त्यांचा नाश केला ॥ १५ ॥

परीक्षित्‌राजा म्हणतो,--हे शुकमुने, क्षत्रियांनीं आपलीं इंद्रियें स्वाधीन ठेविलीं नव्हतीं हें खरें; पण त्यांचा बारंवार समूळ नाश करण्याइतका भगवान् रामाचा त्यांनीं कोणता अपराध केला होता बरें ? ॥ १६ ॥

शुकाचार्य सांगतात,---हे राजा, त्या वेळीं हैहयांचा राजा अर्जुन नांवाचा मोठा पराक्रमी क्षत्रिय होता. त्यानें नारायणाच्या अंशावतार जो दत्त त्याची सेवा करून त्याला प्रसन्न करून घेतलें ॥ १७ ॥ दत्त प्रसन्न झाला असतां त्याच्यापासून त्यानें हजार बाहु आणि शत्रूपासून अजिंक्यपण यांची प्राप्ति करून घेतली. तसेंच इंद्रियांची अकुंठित शक्ति, संपत्ति, तेज, पराक्रम, कीर्ति आणि शरीरबळ हींहि त्यानें दत्तापासून मिळविलीं ॥ १८ ॥ मोठ्या योगसिद्धीचें ऐश्वर्य प्राप्त करून अतिसूक्ष्म रूप धारण करणें इत्यादि सामर्थ्यांहि त्यानें मिळविलें आणि वायु जसा सर्व भुवनांत स्वैर संचार करितो, तसा तो अकुंठितपणें सर्वत्र फिरूं लागला ॥ १९ ॥ तो आपल्या सुंदर स्त्रियांसह नर्मदानदीच्या पाण्यांत उन्मत्तपणें क्रीडा करी आणि वैजयंती माळ घालून आपल्या सहस्र बाहूंनीं नदीचा प्रवाह अडवून धरी ॥ २० ॥ एकदां पाणी अडविल्यामुळें उत्पन्न झालेल्या उलट दिशेच्या प्रवाहानें रावणाचें शिबिर * वाहून गेलें. हें पाहून रावणाला अर्जुनाचें तें कृत्य सहन झालें नाहीं. तो स्वतःला मोठा पराक्रमी समजत होता ॥ २१ ॥ त्यानें अर्जुनाजवळ येऊन त्याचा अपमान केला. तेव्हा अर्जुनानें आपल्या स्त्रियांसमक्ष त्याला एखाद्या वानराप्रमाणें पकडून आपल्या नगरींत नेलें आणि तेथें कांहीं काळ बंदींत ठेविल्यावर पुढें त्याला सोडून दिलें ॥ २२ ॥ एकदां अर्जुन एका दाट अरण्यांत मृगया करीत असतां सहजगत्या जमदग्नीच्या आश्रमांत शिरला ॥ २३ ॥ राजा आपल्या आश्रमांत आलेला पाहून जमदग्नीनें त्याचें, त्याच्या अमात्यांचें आणि सर्व सैन्याचेंहि योग्य आतिथ्य केलें. तपश्चर्या हेंच जमदग्नीचें सर्वस्व होतें; पण त्याच्यापाशीं कामधेनु असल्यामुळें त्याला कसली अडचण पडली नाहीं ॥ २४ ॥ वीर्यशाली अर्जुनाला आपल्या ऐश्वर्याला मागें सारणारें असें तें मुनीचें ऐश्वर्य पाहून मत्सर उत्पन्न झाला आणि कामधेनूचा अभिलाष उत्पन्न झाल्यामुळें जमदग्नीनें केलेल्या सत्कारानें त्याला संतोष वाटला नाहीं ॥ २५ ॥ त्यानें गर्विष्ठपणें आपल्या हैहयसैनिकांना जमदग्नीची कामधेनु घेऊन जाण्याची आज्ञा केली व त्याप्रमाणें त्या गाईला वासरासह, ती ओरडत

* रावण दिग्विजयाला निघाला असतां आपल्या सैन्याचा तळ नर्मदेच्या तीरीं देऊन अर्जुनाच्या माहिष्मतीनगरीजवळ राहिला असतां त्याच्या देवपूजेच्या प्रसंगीं त्याची जागा वाहून गेली अशी कथा आहे.

असतांहि ते माहिष्मतिनगरीला घेऊन गेले ।। २६ ।। याप्रमाणें वर्तन करून सहस्रार्जुन तेथून निघून गेल्यावर राम आश्रमांत परत आला आणि अर्जुनाच्या अत्याचाराचें वृत्त ऐकून डंवचलेल्या सर्पाप्रमाणें तो संतापून गेला ।। २७ ।। मग आपली अतिशय तीक्ष्ण कुऱ्हाड, भाते, धनुष्य आणि ढाल घेऊन सिंह जसा मोठ्या हत्तीच्या मागें लागतो, तसा तो राम असह्य वेगानें सहस्रार्जुनाच्या मागोमाग धांवत गेला ।। २८ ।। हरिणांचें कातडें पांघरलेला व सूर्यासारख्या तेजस्वी, जटा धारण करणारा भृगुश्रेष्ठ, धनुष्यबाण व परशु हीं हत्यारें घेऊन आपल्यावर चालून येत आहे असें सहस्रार्जुनाला दिसलें. त्या वेळीं तो आपल्या राजधानीला पोंचून आंत प्रवेश करीत होता ।। २९ ।। परशुरामाला पाहातांच त्यानें हत्ती, घोडे, रथ व पायदळ असें चतुरंग सैन्य त्याच्यावर सोडिलें. त्या सैन्यापाशीं गदा, तरवारी, बाण, ऋष्टि, शतघ्नी, शक्ति अशीं विविध शस्त्रास्त्रें होतीं. तें सैन्य भयंकर असून संख्येनें सत्तर अक्षौहिणी होतें पण एकट्या भगवान् रामानें त्या सर्व सैन्याचा निःपात, केला ।। ३० ।। मनाप्रमाणें वेगवान् व वायूप्रमाणें सामर्थ्यवान् असा तो राम, आपल्या परशूनें शत्रुसैन्याचा नाश करीत जिकडे जिकडे जाई, तिकडे तिकडे तुटलेले बाहू, मांड्या, शिरें व मेलेले सारथी आणि घोडे यांच्या राशी भूमीवर पडूं लागत ।। ३१ ।। याप्रमाणें परशुरामाचीं कुऱ्हाड आणि बाण यामुळें रणभूमीवर रक्ताचे प्रवाह वाहून चिखल झाला असून त्यांत आपलें सैन्य, ढाली, पताका, धनुष्यें आणि सैनिकांचीं शरीरें छिन्नविछिन्न होऊन लोळत पडलीं आहेत असें पाहून हैहयपति अर्जुनाला मोठा राग आला आणि तो स्वतः रामावर चालून गेला ।। ३२ ।। त्यानें एकाच वेळीं आपल्या सहस्रबाहूंनीं पांचशें धनुष्यावर बाण चढवून ते परशुरामावर सोडिले; पण अस्त्रधारी वीरांमध्यें श्रेष्ठ अशा रामानें आपल्या एकाच धनुष्यानें बाण सोडून अर्जुनाचे ते सर्व बाण तोडून टाकिले ।। ३३ ।। मग अर्जुन मोठमोठे पाषाण व वृक्ष आपल्या हातांनीं उचलून घेऊन त्या समरांगणांत वेगानें रामाच्या अंगावर धावून गेला; पण रामानें आपल्या तीक्ष्ण धारेच्या कुऱ्हाडीनें त्याचे सर्व बाहु सर्पाच्या फणा तोडाव्या त्याप्रमाणें भराभर तोडून टाकिले ।। ३४ ।। सर्व बाहु तोडून टाकिल्यावर पर्वताचें शिखर खालीं पाडावें त्याप्रमाणें रामानें अर्जुनाचें मस्तकहि खालीं पाडिलें. याप्रमाणें अर्जुनाचा वध झाल्यावर त्याचे दहा हजार पुत्र भयानें पळून गेले ।। ३५ ।। नंतर शत्रूंचा निःपात करणारा राम आपली कामधेनु वासरासह घेऊन आश्रमांत परत आला आणि दुःखित झालेल्या तिला त्यानें पित्याच्या स्वाधीन केलें ।। ३६ ।। आपण केलेल्या पराक्रमाचें वृत्तहि त्यानें आपल्या पित्याला व भावांना सांगितलें. तें ऐकून जमदग्नि म्हणाला ।। ३७ ।। ‘ हे रामा, तूं मोठा पराक्रमी खरा; पण तूं हें मोठें पाप केलेंस; अरेरे,

सर्व देवांचें ज्याच्या शरिरांत वास्तव्य असतें अशा राजाला तूं व्यर्थ मारिलेंस ॥ ३८ ॥ अरे बाळा, आपण ब्राह्मण असून क्षमेमुळेंच आपण सर्वांच्या बहुमानाला पात्र झालों आहों. सर्व लोकांचा उत्पत्तिकर्ता अशा ब्रह्मदेवालासुद्धां सर्वश्रेष्ठ अशा उच्चपदाची प्राप्ति झाली ॥ ३९ ॥ ब्राह्मणाचें तेज सूर्याच्या प्रभेप्रमाणें जें झळकतें आहे तें क्षमेमुळेंच होय. जे क्षमाशील असतात त्यांच्यावरच भगवान् श्रीहरि सत्वर संतुष्ट होतो ॥ ४० ॥ अरे, मूर्धाभिषिक्त राजाचा वध करणें हें ब्राह्मणाच्या वधापेक्षांहि मोठें पातक होय. यास्तव हे रामा, भगवंताकडे चित्त लावून तीर्थयात्रा कर आणि हें पाप धुऊन काढ ॥ ४१ ॥

## पंधरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १६ वा

शुकाचार्य सांगतात,–हे परीक्षित्‌राजा, परशुरामाला पित्यानें याप्रमाणें पापक्षालन करण्याचा उपदेश केला असतां त्यानें त्याप्रमाणें एक वर्षपर्यंत तीर्थाटन केलें आणि मग तो आश्रमाला परत आला ॥ १॥ नंतर एक दिवस त्याची माता रेणुका गंगेवर गेली असतां तेथें गंधर्वांचा राजा चित्ररथ गळ्यांत कमळांच्या माळा घालून अप्सरांसह जलक्रीडा करीत असलेला तिच्या दृष्टीस पडला ॥२॥ ती पाणी आणण्यासाठीं म्हणून नदीवर गेली असतांहि जलक्रीडा करणाऱ्या गंधर्वराजाला पाहून तिच्या मनांत त्याच्याविषयीं थोडीशी इच्छा उत्पन्न झाली आणि घरीं अग्नीला आहुति द्यावयाची वेळ झालेली आहे या गोष्टीचें भान कांहीं वेळ राहिलें नाहीं ॥३॥ पण इतक्यांत आपल्याला उशीर झाला असें पाहून आतां जमदग्नीचा आपल्यावर राग होईल या भीतीनें तो पाण्याची घागर घेऊन तडक घरीं आली आणि घागर खालीं ठेवून पतीपुढें हात जोडून उभी राहिली ॥ ४ ॥ आपल्या पत्नीनें मनानें तरी व्यभिचार केला हें जमदग्नीला समजल्यावर त्याला मनस्वी राग आला आणि तो आपल्या मुलांना म्हणाला, ‘ मुलांनो, या पापिणीला मारून टाका!’ पण मुलांनीं तसें कांहीं केलें नाहीं ॥ ५ ॥ मग जमदग्नीनें रामाला उद्देशून आज्ञा केली असतां त्यानें मात्र भाऊ आणि माता यांचा वध केला. कारण जमदग्नींच्या योगसामर्थ्याचा व तपश्चर्येचा प्रभाव त्याला चांगला ठाऊक होता ॥ ६ ॥ मातेचा आणि भावांचा वध केल्यावर परशुरामाला अर्थातच वाईट वाटलें; पण जमदग्नीला रामाचा आज्ञाधारकपणा पाहून संतोष झाला आणि त्याला त्यानें वर मागावयास सांगितलें. तेव्हां ‘वध पावलेले सगळे भाऊ मातेसह जिवंत व्हावे आणि त्यांना आपल्या वधाची आठवणहि राहूं नये’ असा वर रामानें मागितला ॥ ७ ॥ त्याबरोबर झोंप पुरी झाल्यावर जसें सुखानें उठावें त्याप्रमाणें तीं सगळीं सुखरूप उठून बसलीं. पित्याच्या तपश्चर्येचें हें सामर्थ्य ठाऊक असल्यामुळें परशुरामानें आपल्या बंधूंचा वध केला ॥ ८ ॥ असो. इकडे सहस्रार्जुनाचे जे मुलगे होते, त्यांना आपल्या पित्याच्या वधाची आठवण नित्य होई; पण रामाच्या पराक्रमापुढें त्यांचें कांहीं न चालल्यामुळें ते नित्य कष्टी असत ॥९॥ या वैराचा सूड घेण्याची संधि केव्हां मिळेल याची ते वाट पाहात होते. तेव्हां एकदां या परशुराम आपल्या भावांसह आश्रमांतून कांहीं कामाकरितां अरण्यांत गेला आहे असें पाहून ते तेथें आले ॥ १० ॥ तेथें अग्निगृहामध्यें जमदग्नि बसला असून त्यानें आपलें चित्त पुण्यकीर्ति भगवंताकडे लाविलें होतें. त्याला पाहातांच त्या पापबुद्धीच्या अर्जुनपुत्रांनीं त्याचा शिरच्छेद केला ॥ ११ ॥ रामाच्या मातेनें दीनपणानें तसें न करण्याविषयीं त्यांची प्रार्थना केली; पण त्या नीच व क्रूर क्षत्रियांनीं बलात्कारानें त्याचें शिर तोडलें आणि ते तें घेऊन गेले ॥ १२ ॥ तेव्हां रेणुका शोकानें अगदीं विव्हळ झाली आणि आपला ऊर बडवीत ती साध्वी अरे रामा,

त्याच वेळीं तूं कोठें रे गेलास ? अरे लवकर ये,धांव, असें मोठ्यानें ओरडूं लागली ॥ १३ ॥ राम दूर गेला होता, तरी रामा, ये, लवकर ये रे धांव. असा मातेचा आक्रोश ऐकतांच तो तसाच आश्रमांत धांवत आला व पहातो तों पित्याचा वध झालेला त्याच्या दृष्टीस पडला ॥ १४ ॥ तो प्रकार पाहातांच त्याला अनिवार दु:ख झालें व भयंकर रागहि आला. त्या विकारांच्या आवेशांत तो अगदीं मूर्च्छित झाला आणि ' हे तात, केवढें तुमचें सदाचरण व धर्मनिष्ठा ! तुम्ही आम्हांला टाकून कीं हो स्वर्गाला गेलांत ! ' असा विलाप करूं लागला ॥ १५ ॥ याप्रमाणें विलाप केल्यावर दु:खाचा वेग कमी होतांच रामानें पित्याचा देह भावांच्या स्वाधीन केला आणि स्वत: कुऱ्हाड घेऊन क्षत्रियांचा नि:पात करण्याच्या निश्चयानें तो तेथून तडक निघाला ॥ १६ ॥ तो प्रथम माहिष्मतीनगरीला गेला. ब्रह्मवधाच्या पापामुळें त्या नगरीचीं शोभा आधींच नष्ट झालेली होती. रामानें तेथें गेल्यावर सहस्रार्जुनाच्या पुत्रांचीं मस्तकें तोडलीं आणि त्यांच्या राशींनीं नगराच्या मध्यभागीं मोठा पर्वतच उभारिला ॥ १७ ॥ तसेंच त्यांच्या रक्तापासून भयंकर नदी वाहूं लागली व ती ब्राह्मणांचा द्वेष करणाऱ्यांना भयाचें स्थान होऊन बसली. याप्रमाणें क्षत्रिय लोक पापकर्म करूं लागले असतां परशुरामानें आपल्या पित्याच्या वधाचें निमित्त करून त्यांचा नाश केला ॥ १८ ॥ त्यानें एकवीस वेळां पृथ्वी नि:क्षत्रिय केली आणि स्यमंतपंचकनामक प्रदेशांत रक्ताचे नऊ डोह भरून काढिले ॥ १९ ॥ त्यानें पित्याचें शिर त्याच्या शरिराला लावून त्याचें उत्तरकार्य केलें आणि शेवटीं अनेक यज्ञ करून त्यांत सर्वदेवस्वरूपी अशा परमात्म्याचें पूजन केलें ॥ २० ॥ त्या यज्ञांत परशुरामानें पूर्व दिशा होत्याला दिली, दक्षिण दिशा ब्रह्मयाला दिली, पश्चिम दिशा अध्वर्यूला दिली आणि उत्तर दिशा उद्गात्याला दिली ॥ २१ ॥ त्याचप्रमाणें उरलेल्या दिशा इतर ऋत्विजांना देऊन मध्यभाग कश्यपाला त्यानें दिला, उपद्रष्ट्याला आर्यावर्त दिला आणि उरलेला भाग सभासदांना दिला ॥ २२ ॥ याप्रमाणें दक्षिणा दिल्यावर ब्रह्मदेवाच्या सरस्वतीनदींत अवभृथस्नान करून त्यानें सर्व पापाचें क्षालन केलें आणि त्यामुळें मेघांपासून मुक्त झालेल्या सूर्याप्रमाणें तो तळपूं लागला ॥ २३ ॥ जमदग्नीलाहि स्मृतिरूप शरीर प्राप्त होऊन सप्तर्षींच्या समूहांत तो सातवा ऋषि होऊन राहिला ॥ २४ ॥ शुकाचार्य सांगतात,—हे राजा, हा जमदग्नीचा पुत्र भगवान् कमलनयन परशुराम पुढें येणाऱ्या मन्वंतरामध्यें वेदमार्गाचा प्रवर्तक होणार आहे ॥ २५ ॥ प्रस्तुत त्यानें दंडाचा त्याग केला असून शांत मनानें तो महेन्द्रपर्वतावर राहिला आहे व तेथें सिद्ध, गंधर्व आणि चारण हे त्याच्या पराक्रमांचें वर्णन करीत असतात ॥ २६ ॥ याप्रमाणें सर्वांतर्यामी अशा सर्वसमर्थ भगवान् श्रीहरीनें भृगुकुलांत जन्म घेऊन पृथ्वीला भारभूत झालेल्या राजांचा बहुतेक नि:पात केला ॥ २७ ॥ असो. गाधि राजाला प्रज्वलित अग्नीसारखा अत्यंत तेजस्वी असा विश्वामित्र नांवाचा पुत्र होता. त्यानें तपश्चर्या करून क्षात्रवृत्ति सोडिली व ब्रह्मतेजाची प्राप्ति करून घेतली ॥ २८ ॥ या विश्वामित्राला शंभर पुत्र होते. त्यांतील मधला पुत्र मधुच्छंद असल्यामुळें सर्वांनाच मधुच्छंदस् म्हणत ॥ २९ ॥ भृगुवंशीय अजीगर्तऋषीचा शुन:शेपनामक मुलगा होता. तो देवांनीं

विश्वामित्राला दिल्यामुळें त्याला देवरात म्हणत. या देवराताला विश्वामित्रानें आपला पुत्र मानून आपल्या मुलांनीं त्यालाच वडील भाऊ मानावें असें त्यांना सांगितलें ॥३० ॥ हा शुन:शेप हरिश्चंद्राच्या यज्ञामध्यें बळी देण्यासाठीं म्हणून विकत घेतलेला होता व त्याला यूपाशीं बांधिलें असतां त्यानें ब्रह्मदेव आदिकरून देवांची स्तुति करून पाशांतून आपली सुटका करून घेतली होती ॥ ३१ ॥ त्या यज्ञांत तो भृगुकुलोत्पन्न शुन:शेप दीनवाणा झाला असतां देवांनीं त्याला गाधिकुळांत दिल्यामुळें तो देवरात नांवानें प्रसिद्ध झाला ॥ ३२ ॥ पण ही गोष्ट विश्वमित्राच्या पन्नास वडील मुलांना आवडली नाहीं. त्यामुळें विश्वामित्राला राग येऊन त्यानें 'हे दुष्टांनो, तुम्ही म्लेंच्छ व्हा !' असा त्यांना शाप दिला ॥ ३३ ॥ उरलेल्या धाकट्या पन्नास भावांसह मधल्या मधुच्छंदानें मात्र त्या वेळीं सांगितलें कीं, 'बाबा, तुम्ही ठरवाल तसेंच आम्ही वागूं' ॥ ३४ ॥ असें म्हणून त्यांनीं मंत्रद्रष्ट्या देवराताला आपला वडील भाऊ केलें आणि त्याला ते म्हणाले,–आम्हीं तुझ्या अनुरोधानेंच वागूं. धाकट्या मुलांचें हें मनासारखें आचरण पाहून विश्वामित्र संतुष्ट होऊन त्यांना म्हणाला, 'मुलांनो,तुम्हीं माझ्या म्हणण्याला अनुमोदन देऊन मला वीरपुत्रांचा पिता केलें, यास्तव तुम्हांलाहि असेच वीर्यशाली पुत्र होतील ॥३५॥ बाळांनो,हा देवरात तुमचा पराक्रमी वडील बंधु आहे, तुम्ही याला अनुसरून वागा ! असो. विश्वामित्राला आणखीहि अष्टक, हारीत, जय, क्रतुमत् इत्यादि पुत्र होते ॥ ३६ ॥ याप्रमाणें विश्वामित्राच्या अनेक मुलांमुळें कौशिक गोत्राच्या अनेक शाखा झाल्या. कौशिक गोत्राला जें दुसरें प्रवर मिळालें त्याचा हा असा इतिहास आहे ॥ ३७ ॥

## सोळावा अध्याय समाप्त

# अध्याय १७ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित्‌राजा, पुरूरवाराजाचा जो आयुनामक पुत्र होता, त्याला नहुष, क्षत्रवृद्ध, रजि वार्यशाली, रंभ आणि अनेना असे पांच मुलगे होते. त्यांपैकीं क्षत्रवृद्धाचा वंश आतां ऐक. क्षत्रवृद्धाचा मुलगा जो सुहोत्र त्याला तीन पुत्र होते ॥ १ ॥ २ ॥ त्यांचीं नांवें काश्य, कुश आणि गृत्समद अशीं होतीं. गृत्समदापासून पुढें शुनक झाला आणि शुनकाचा पुत्र शौनक होय. हा शौनक ऋग्वेद जाणणाऱ्या ऋषींत श्रेष्ठ होता ॥ ३ ॥ काश्याचा पुत्र काशि आणि काशीचा पुत्र राष्ट्रनामक असून राष्ट्राला दीर्घतमा हा पुत्र झाला. दीर्घतमसाचा पुत्र धन्वंतरि हा आयुर्वेदाचा मूळ संस्थापक होय ॥ ४ ॥ तो यज्ञभोक्त्या वासुदेवाचा अंशावतार असून त्याच्या केवळ स्मरणानेंच सर्व दुःखांचा परिहार होतो. धन्वंतरीचा पुत्र केतुमान् नांवाचा असून केतुमानाला भीमरथ हा पुत्र झाला ॥५॥ भीमरथपासून द्युमातन् झाला. त्याचा प्रर्दन असेंही म्हणतात. त्याला अणखी शत्रुजित्, ऋतध्वज आणि कुवलयाश्व अशींहि नांवें होतीं. कुवलयाश्वाचे अलर्क आदिकरून पुष्कळ मुलगे होते ॥६॥ शुकाचार्य परीक्षिताला सांगतात,—हे राजा, या अलर्काशिवाय दुसरा कोणीहि तरुण साठ हजार साठशें वर्षेपर्यंत या पृथ्वीवर राज्य करूं शकला नाहीं ॥ ७ ॥ अलर्काचा पुत्र संतति, संततीचा सुनीथ, सुनीथाचा सुकेतन होय. सुकेतनाला धर्मकेतु हा पुत्र झाला आणि धर्मकेतूला सत्यकेतु झाला ॥ ८ ॥ सत्यकेतूचा पुत्र धृष्टकेतु. त्याच्या-पासून सुकुमार हा झाला. हा सर्व पृथ्वीचें राज्य करिता झाला. सुकुमाराचा पुत्र वीतिहोत्र, वीतिहोत्राचा भर्ग आणि भर्गापासून भार्गभूमि झाला व तो राज्यपद पावला ॥ ९ ॥ याप्रमाणें क्षत्रवृद्धाच्या वंशांत काशिराजापासून झालेले राजे होत. पुरूरव्याचा आणखी एक पुत्र जो रंभ त्याला रभस हा पुत्र होता. रभसाचा गंभीर आणि गंभीराचा अक्रिय होय ॥ १० ॥ अक्रियाच्या × स्त्रीच्या पोटीं कांहीं संतान नव्हतें. आतां अनेनाचा वंश सांगतों तो ऐक. अनेनाचा पुत्र शुद्ध व शुद्धाचा शुचि नांवाचा पुत्र होता. शुचीपासून त्रिककुद् * झाला. हा धर्माचा मोठा वाली होता ॥ ११ ॥ त्याच्यापासून शांतरय झाला. शांतरय हा आत्मज्ञानी असून त्यांतच धन्यता मानणारा होता. पुरूरव्याचा आणखी एक पुत्र जो रजि त्याला पांचशें पुत्र होते व ते सर्वहि फार तेजस्वी होते ॥ १२ ॥ दैत्यांनीं इंद्राचा

× अक्रिय आणि शांतरय हीं नांवें सार्थ दिसतात. अक्रियाच्या क्षेत्रांत ब्रह्म उत्पन्न झालें म्हणजे त्याचा वंश समाप्त झाला. तसेंच शांतरयाचेंहि होय. हे ज्ञानी असल्यामुळें संसारविमुख होते.

* धर्माचा वाली किंवा पुरस्कर्ता या अर्थाचें धर्मसारथि हें विशेषण न घेतां त्रिककुदाचा पुत्र धर्मसारथि नांवाचा होता असाहि अर्थ घेतां येईल.

स्वर्ग त्याच्यापासून हरण केला असतां देवांनीं रजीचें साहाय्य मागितलें व रजीनें दैत्यांना मारून स्वर्गाचें राज्य पुनः इंद्राच्या स्वाधीन केलें; परंतु इंद्रानें तें पुनः रजीलाच दिलें आणि त्याचे पाय धरून आणखी सहाय्य मागितले ॥१३॥ इंद्राला प्रल्हाद आदिकरून दैत्यांची भीति वाटत होती, त्यामुळें त्यानें रजीला याप्रमाणें संतुष्ट ठेवून आपला देह त्याच्या सेवेला अर्पण केला; पण पुढें रजि मरण पावल्यावर त्याच्या पुत्रांपाशीं इंद्र स्वर्गाचें राज्य मागूं लागला असतां ते देईनात. इतकेंच नव्हे तर देवगुरु बृहस्पति यज्ञ करून अग्नीला आहुति देत असतां ते रजीचे पुत्र यज्ञांतील हविर्भागहि आपणच घेऊं लागले. याप्रमाणें रजीच्या पुत्रांनीं नीतिमार्ग सोडिला हें पाहून त्या सर्वांचा इन्द्रानें वध केला. एकालाहि त्यानें जिवंत ठेविलें नाहीं असो. क्षत्रवृद्धाच्या सुहोत्रनामक मुलाचा दुसरा पुत्र जो कुश, त्याला प्रतिनामक पुत्र असून प्रतीला संजय नांवाचा मुलगा होता व संजयाला जय नांवाचा होता ॥१४॥१५॥ १६॥ जयाला कृत हा पुत्र झाला आणि कृताला हर्यवन हा पुत्र होऊन त्याच्या मागें राजा झाला. हर्यवनानंतर सहदेव व सहदेवाचा हीन आणि हीनाचा पुत्र जयसेन असे क्रमानें झाले ॥ १७ ॥ जयसेनाला संकृति नांवाचा पुत्र होता. संकृतीचा पुत्र जय हा मोठा पराक्रमी असून क्षत्रियधर्मानें वागणारा होता. असे हे क्षात्रवृद्धाच्या वंशांतील राजे होत. आतां पुरूरव्याचा वडील पुत्र जो नहुष त्याचा वंश सांगतों तो ऐक ॥ १८ ॥

**अध्याय सतरावा समाप्त**

---

# अध्याय १८वा

शुकाचार्य परीक्षितीला सांगतात,---हे राजा, देहाचीं जशीं सहा इंद्रियें त्याप्रमाणें नहुषाला यति, ययाति, संयाति आयति, वियति आणि कृति असे सहा पुत्र होते ॥ १ ॥ त्यांत यतीला पित्यानें राज्य दिलें असतां, त्याचे पुढील परिणाम जाणून यतीनें त्याचा स्वीकार केला नाहीं ॥ २ ॥ पुढें नहुषाला इंद्राचा अधिकार कांहीं काळ मिळाला असतां त्यानें इंद्राणीचा अपमान करण्याचा प्रयत्न केल्यामुळें ब्राह्मणांनीं त्याला अजगराच्या योनींत घातलें; त्या वेळीं ययाति राज्यारूढ झाला ॥ ३ ॥ त्यानें आपल्या चार धाकट्या भावांना चार दिशांचे अधिकारी नेमिलें आणि शुक्राचार्य आणि वृषपर्वा यांच्या कन्यांशीं विवाह करून राज्याचें रक्षण केलें ॥ ४ ॥

परीक्षित् राजा विचारतो,—हे शुकमुने, भगवान् शुक्राचार्य हा ब्रह्मर्षि होता; आणि नहुषपुत्र ययाति तर क्षत्रियकुळांत जन्मलेला होता. असें असतां ब्राह्मण आणि क्षत्रिय या कुळांमध्यें उलटा म्हणजे प्रतिलोम * विवाह कसा घडून आला बरें ! ॥ ५ ॥

शुकाचार्य सांगतात,---हे राजा, दानवांचा राजा जो वृषपर्वा त्याची शर्मिष्ठा नांवाची कन्या होती. ती मोठी मानी असून एके दिवशीं आपल्या मैत्रिणींना तसेंच शुक्राचार्यांची कन्या जी देवयानी तिला समागमें घेऊन नगराबाहेरील उपवनांत फिरावयास गेली. त्या उपवनांत फुलझाडांच्या रांगा लागून गेल्या होत्या आणि त्यांतील सरोवरांच्या काठीं मंजुळ गुंजारव करणाऱ्या भुंग्यांचे थवे कमळांतील मध सेवन करीत फिरत होते ॥ ६ ॥ ॥ ७ ॥ त्या सुंदर मुली फिरतां फिरतां एक सरोवराजवळ आल्या. तेथें त्यांनीं आपलीं वस्त्रें कांठावर सोडून ठेविलीं आणि पाण्यांत जाऊन एकमेकींच्या अंगांवर पाणी उडवीत त्या खेळूं लागल्या ॥ ८ ॥ इतक्यांत भगवान् शंकर नंदीवर बसून देवी पार्वतीसह तिकडून जात होता, तो त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला पाहतांच लाजून त्या मुली लगबगीनें पाण्याबाहेर आल्या व आपलीं वस्त्रें नेसूं लागल्या ॥ ९ ॥ गडबडींत शर्मिष्ठा न जाणतां शुक्रकन्या देवयानीचें वस्त्र आपलें समजून नेसली; पण तें पाहतांच देवयानीला संताप येऊन ती म्हणाली ॥ १० ॥ काय पाहा या बटकीचें हें अयोग्य करणें तें ! कुत्रीनें यज्ञांतील हविर्भाग घ्यावा, तसें आम्ही नेसावयाचें वस्त्र ही नेसली ॥ ११ ॥ अहो ! आम्ही ब्राह्मणांनीं हें सर्व जग तपश्चर्येच्या सामर्थ्यानें उत्पन्न केलें असून भगवान् पुरुषोत्तमाचें मुखच

---

* चार वर्णांपैकीं एका वर्णाचा दुसऱ्या वर्णाशीं विवाहसंबंध दोन प्रकारांनीं संभवतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांतील पहिल्या पहिल्या वर्णाचा पुरुष आणि पुढील पुढील वर्णाची स्त्री यांतील विवाह अनुलोम समजतात. याच्या उलट म्हणजे पहिल्या पहिल्या वर्णाची स्त्री व पुढील वर्णाचा पुरुष यांच्या विवाहाला प्रतिलोम समजतात.

आम्ही आहों. परब्रह्म स्त्री सर्व आधार आम्हा ब्राह्मणांचाच असून वेदांतील कल्याणप्रद कर्ममार्ग ब्राह्मणांनींच दाखवून दिला आहे ॥ १२ ॥ ब्राह्मणांना लोकांचे अधिपति व मोठमोठे देवच नमस्कार करितात व त्यांची स्तुति असें नाहीं; तर लक्ष्मीचें निवासस्थान असा परमपवित्र भगवान् परमात्मा देखील त्यांना मान देतो ॥ १३ ॥ त्या ब्राह्मणांतहि आम्ही म्हणजे भृगुकुलांत जन्मलेले ब्राह्मण आणि हिचा पिता वृषपर्वा असुर हा तर आमचा शिष्य. असें असतां ही दांडगी, शूद्रानें वेद घ्यावा तसे आमचें नेसण्याचें वस्त्र घेऊन नेसली ॥ १४ ॥ याप्रमाणें देवयानी फडाफड शर्मिष्ठेला तोडून बोलली असतां शर्मिष्ठेनें त्या गुरुकन्येलाहि तसेंच उत्तर दिलें. तिला अनावर राग आला. ती दीर्घ श्वास सोडूं लागली आणि डंवचलेल्या नागिणीप्रमाणें दांतओंठ चावूं लागली ॥ १५ ॥ ती म्हणाली,–' हें भिकाऱ्याच्या पोरी, आपल्या पायांखालीं काय आहे हें न पाहतांच तूं एवढी बडबड मांडिली आहेस. पण बळीवर उपजीविका करणाऱ्या कावळ्यांप्रमाणें तूं जरी आमच्याच घराकडे आशाळभूतपणें पाहात असतेस ना ?' ॥ १६ ॥ याप्रमाणें कठोर शब्दांनीं त्या आचार्यकन्या देवयानीची शर्मिष्ठेनें निंदा केली आणि आपलें वस्त्र रागानें घेऊन व देवयानीला एका विहिरींत लोटून ती तेथून निघून गेली ॥ १७ ॥ शर्मिष्ठा घरीं गेल्यावर इकडे असें झालें कीं, ययाति राजा रानांत शिकार करीत असतां तहान लागल्यामुळें पाणी पिण्यासाठीं सहज त्या विहिरीपाशीं आला. अर्थात् देवयानी विहिरींत होती ती त्याच्या दृष्टीस पडली ॥ १८ ॥ तिच्या अंगावर मुळींच वस्त्र नाहीं असें पाहून त्या दयाळू राजानें आपल्या अंगावरील शेला तिला दिला आणि आपल्या हातानें तिचा हात धरून तिला बाहेर काढिलें ॥ १९ ॥ तेव्हां देवयानीच्या मनांत प्रेम उत्पन्न होऊन त्या शूर राजाला ती प्रेमानें ओथंबलेल्या स्वरानें म्हणाली,'हे शत्रुदमना राजा, तूं माझा हात * स्वीकारिला आहेस ॥ २० ॥ तूं माझा अंगिकार केल्यामुळें आतां दुसरा कोणीहि माझें पाणिग्रहण करणारा असूं नये. आपला या क्षणीं जमलेला संबंध मानवी प्रयत्नांनीं घडून आलेला नसून खरोखर ईश्वरी नियमानेंच घडून आला आहे असें मला वाटतें ॥ २१ ॥ कारण असें पाहा कीं, मी विहिरींत पडलें असतां आपलें हे अवचित दर्शन मला झालें. हे पराक्रमी राजा, शिवाय कोणीहि ब्राह्मण माझें पाणिग्रहण करणार नाही, असा मला बृहस्पतिपुत्र जो कच त्यानें शाप दिला आहे. कारण मीहि त्याला अगोदर शाप दिला होता, ॥ २२ ॥ ययातीच्या मनांत देवयानीविषयीं अभिलाषा येणें शक्य नव्हतें; पण दैवानेंच हा प्रकार घडवून आणिल्यावर आपलें मन तिजकडे लागलें असें जाणून त्यानें देवायनीचें म्हणणें मान्य केलें व तो तेथून निघून गेला ॥ २३ ॥ तो शूर राजा तेथून गेल्यावर देवयानी रडत रडत तेथून पित्याच्या घरीं आली आणि शर्मिष्ठेनें बोललेले शब्द व तिची सर्व

* लग्नांत वर वधूचा हात विधिपूर्वक स्वीकारितो, त्यावरून विवाहाला पाणिग्रहण किंवा हस्तग्रहण असें म्हणतात व पतीला पाणिग्रहण करणारा म्हणतात. या ठिकाणीं त्याला अनुलक्षून पाणिग्रहण शब्दावर कोटी केलेली आहे.

श्रुति त्याच्या कानांवर घातली ॥ २४ ॥ तेव्हां भगवान् शुक्राचार्याला खेद झाला आणि आपण पुरोहितपणा करतों म्हणून असलीं निंदात्मक बोलणीं ऐकून घ्यावीं लागलीं, असें जाणून त्या वृत्तीचा तो निषेध करूं लागला. त्याला वाटलें पांखरें शेतांतील पडलेले दाणे टिपून खातात आणि स्वतंत्रपणें राहातात हेंच फार चांगलें. करितां त्याच वृत्तीनें आपणहि राहावयाचें. असा विचार करून तो देवयानीसह त्या नगरांतून बाहेर पडला ॥२५॥ हें पाहून आता आपल्या प्रतिस्पर्धी देवांना ही गोष्ट मोठी इष्ट होईल अशी वृषपर्व्याला भीति वाटली आणि गुरु शुक्राचार्यांची क्षमा मागून त्याला शांत करण्यासाठीं तो त्याच्या मागोमाग धांवला आणि रस्त्यांतच त्यानें आचार्यांच्या पायांवर मस्तक ठेविलें ॥ २६ ॥ भगवान् शुक्राचार्यांचा राग अर्धा क्षणच टिकणारा होता. वृषपर्वा पायां पडलेला पाहून तो शांत झाला आणि शिष्याला म्हणाला,—हे राजा,कांहीं झालें तरी या मुलीचा त्याग माझ्यानें करवणार नाहीं. यास्तव हिची काय मागणी असेल ती पुरी झाली पाहिजे !॥२७॥ वृषपर्व्यानें तें मान्य करून, काय मागणी आहे म्हणून देवयानीला विचारलें. तेव्हां ती म्हणाली,'माझे वडील मला ज्या घरीं देतील त्या घरीं शर्मिष्ठेनें आपल्या दासींसह माझ्या सेवेला आलें पाहिजे' ॥ २८ ॥ देवयानीची ही मागणी वृषपर्व्याला जडच वाटली;पण शुक्राचार्य निघून गेल्यानें आपल्या राज्यावर आणि प्रजेवर येणारें संकट आणि तो गुरु म्हणून राहिला असतां आपला होणारा लाभ, यांचा विचार करून ही गोष्ट त्यानें मान्य केली व लगेच शर्मिष्ठा त्याप्रमाणें आपल्या सहस्र दासींसह तिच्या सेवेला तत्पर झाली ॥ २९ ॥ मग शुक्राचार्यानें आपली कन्या ययातीला विवाह-विधीनें दिल्यावर शर्मिष्ठाहि तिच्या समागमें गेली. त्या प्रसंगीं शुक्राचार्यानें त्याला सूचना करून ठेविली कीं,—'राजा, शर्मिष्ठेचा पत्नी म्हणून मात्र कधीं स्वीकार करूं नकोस ॥३०॥ पण कालान्तरानें देवयानीला संतति झाली आणि आपल्याला मात्र ती होणें नाहीं, असें पाहून साध्वी शर्मिष्ठेनें ऋतुकाळीं ययातीला आपलें मनोगत एकान्तांत कळविलें आणि आपला स्वीकार करण्याची त्याला विनंति केली ॥ ३१ ॥ शर्मिष्ठा राजकन्या आहे आणि ती केवळ अपत्यप्राप्तीसाठीं प्रार्थना करीत आहे, अर्थात् तिची विनंति मान्य करणें हाच धर्म होय, असें धर्मज्ञ ययातीनें मनाशीं ठरविलें आणि शुक्राचार्यानें दिलेली सूचना लक्षांत असतांहि त्यानें त्या प्रसंगीं दैवानुसार वर्तन केलें ! ॥ ३२ ॥ देवयानीला यदु आणि तुर्वसु असे दोन पुत्र झाले होते आणि शर्मिष्ठेला द्रुह्यु, अनु आणि पूरु असे तीन झाले ॥ ३३ ॥ वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा हिला संतति झाली आणि तीहि आपल्याच पतीपासून, हें कळताच मानी देवयानीला विलक्षण संताप आला आणि त्या आवेशांत ती ययातीच्या घरांतून निघून तडक पित्याकडे आली ॥ ३४ ॥ भोगासक्त ययातिहि मागोमाग तिचें सांत्वन करण्यासाठीं धावत गेला आणि गोड शब्दांनीं तिची समजूत करूं लागला. तो तिच्या पायांहि पडला पण कांहीं केल्यानें देवयानीची समजूत होईना ॥३५॥ शुक्राचार्यालाहि राग आला कारण ययाति सूचनेप्रमाणें वागला नव्हता. तो राजाला म्हणाला,—' अरे स्त्रीलंपटा, अरे खोटें बोलणाऱ्या माणसा, काय तुझी ही मंदबुद्धि मनुष्याला विरूप करणारी जरा तुला ग्रासून टाको ! '॥ ३६ ॥

शुक्राचार्यांच्या तोंडून निघालेला शाप ऐकतांच ययातीला वाईट वाटलें आणि तो म्हणाला,–‘ अहो आचार्य, आपण आपली कन्या मला दिली, पण तिच्याशीं भोगलेल्या विलासांनीं माझी अद्यापि तृप्ति झाली नाहीं. तरी कृपा करून उ:शाप द्यावा. ’ ही विनंति ऐकून शुक्राचार्यानें त्याला सांगितलें, ‘ हे राजा, तुझी जरा घेऊन जर आपलें तारुण्य कोणी तुला देईल, तर असा विनिमय तूं खुशाल कर ! ।। ३७ ।। अशी सवड मिळतांच ययाति आपल्या वडील मुलाकडे वळून म्हणाला, ‘ बाळा, यदो, अरे ही माझीं जरा तूं घे आणि आपलें तारुण्य मला दे ।। ३८ ।। अरे, तुझ्या आजोबांनीं ही जरा माझ्या मागें लाविली आहे; पण बाळा, विषयोपभोगाची माझी तृप्ति अद्यापि झाली नाहीं. तूं आपलें तारुण्य मला देशील, तर त्याचा उपयोग करून मी आणखी कांहीं वर्षें विषयांचा उपभोग घेईन ! ।। ३९ ।।

पित्याचें भाषण ऐकून यदु म्हणाला,–‘ बाबा, तुम्हीं म्हणतां ती गोष्ट खरी; पण तुमची जरा मला या तरुणपणामध्येंच आली असतां ती घेऊन मला राहातां येणें शक्य नाहीं; कारण विषयसुख काय आहे हें एकदां नीट जाणल्याशिवाय मनुष्याला त्याच्याविषयीं खरें वैराग्य येत नाहीं ! ’ ।। ४० ।। शुकाचार्य परीक्षिताला सांगतात,–हे राजा, यदूनें असें उत्तर दिल्यावर ययातीनें तुर्वसु, द्रुह्यु आणि अनु यांनाहि पुनः तीच गोष्ट विचारिली पण धर्म म्हणजे काय याची जाणीव नसल्यामुळें ते अनित्य अशा विषयांनाच नित्य मानीत होते व त्यामुळें पित्याच्या मागणीला त्यांनींहि नकार दिला ।। ४१ ।। नंतर ययातीनें पूरूकडे वळून त्यालाहि तसेंच विचारिलें. हा वयानें ' सर्वांत लहान असला तरी गुणांनीं सर्वांत श्रेष्ठ आहे असें जाणून ययाति म्हणाला, ‘ बाळा, वडील भावांसारखा मला नकार देणें तुला योग्य नाहीं ’ ।। ४२ ।।

पूरूनें उत्तर दिलें, ‘ हे ययातिराजा, पिता हा जन्म देणारा असून त्याच्याच कृपेनें श्रेष्ठ पुरुषार्थाची प्राप्ति होते. यास्तव त्याच्या उपकारांची फेड करणें कोणत्या तरी माणसाला शक्य आहे काय ? ।। ४३ ।। पित्याच्या मनांतील गोष्ट जाणून ती करील तो श्रेष्ठपुत्र होय. पित्यानें स्पष्ट सांगितलें असतां त्याची आज्ञा मानील तो मध्यम होय. अश्रद्धेनें कां होईना, पण पिता सांगतो म्हणून करावयाचें असें करणारा पुत्र कनिष्ठ होय. पण यापलीकडे जाऊन कांहीं झालें तरी पित्याची आज्ञा न मानणारा जो असेल तो पुत्र नसून केवळ पित्याच्या शरिरांतून निघालेला मळच समजावा ’ ।। ४४ ।। असें बोलून पित्याची आज्ञा पूरूनें आनंदानें मान्य केली आणि त्यानें त्याची जरा घेऊन आपलें तारुण्य त्याला दिलें. शुकाचार्य म्हणतात,–हे परीक्षित्‌राजा, तें तारुण्य प्राप्त झाल्यावर ययातीनें यथाशास्त्र विषयांचा उपभोग घेतला ।। ४५ ।। तो सात द्वीपांचा अधिपति होता आणि प्रजेचें पित्याप्रमाणें पालन करीत असे. स्वच्छंदपणें विषयांचा उपभोग घेत असतांहि त्याचीं इंद्रियें कधीं कुंठित झालीं नाहींत ।।४६ ।। त्याची प्रिय पत्नी देवयानी सुद्धां एकान्तांत त्याचे मन अगदीं संतुष्ट ठेवण्याचा नित्य प्रयत्न करी. मनानें, शब्दांनीं, देह

समर्पणानें व त्याला लागेल ती इतर वस्तु योग्य वेळीं पुरवून ती आपल्या प्रिय पतीला मोठा आनंद देई ।। ।। ४७ ।। ययातीनें मोठी दक्षिणा देऊन अनेक यज्ञ केले आणि देवाधि देव सर्ववेदस्वरूपी यज्ञभोक्त्या श्रीहरीचें पूजन केलें ।। ४८ ।। हें सर्व विश्व आकाशांत ज्याप्रमाणें मेघपंक्ति उत्पन्न होते, त्याप्रमाणें परमेश्वराच्या स्वरूपांतच उत्पन्न होतें आणि अनेक प्रकारें भासमान होतें; पण कालान्तरानें स्वप्नांतील देखाव्याप्रमाणें किंवा मनांतील तरंगाप्रमाणें तें पुन: भासत नाहींसेंहि होतें ।। ४९ ।। त्या हृदयस्थ वासुदेवाचीच चित्तामध्यें स्थापना करून व वैराग्यशील होऊन ययातीनें सूक्ष्मस्वरूपी अशा त्या प्रभु नारायणाचें पूजन केलें ।। ५० ।। याप्रमाणें एक सहस्र वर्षेपर्यंत मनासह सहा इंद्रियांनीं विषयांचा उपभोग त्यानें मनसोक्त घेतला. पण त्या सार्वभौम ययातीची तृप्ति म्हणून झाली नाहीं ।। ५१ ।।

## अध्याय अठरावा समाप्त

# अध्याय १९ वा

शुकाचार्य परीक्षितराजाला म्हणतात,—हे राजा, ययातिराजा याप्रमाणें स्त्रीलंपट होऊन विषयोपभोग भोगीत असतां आपल्याला आत्मस्वरूपाचा विसर पडत आहे ही गोष्ट त्याच्या लक्षांत आली आणि त्यामुळें खिन्न होऊन देवायानीची समजूत घालण्याकरितां तिला कल्पित कथा सांगूं लागला ॥ १ ॥ तो म्हणाला,—हे देवायनी, माझ्यासारख्याच्या हातून या जगांत घडत असलेली गोष्ट तुला सांगतों ती ऐक. गृहस्थाश्रम करून गांवांत रहाणाऱ्या मनुष्याच्या या कथेविषयीं वनांत राहाणाऱ्या ज्ञानी पुरुषांनाहि दुःख होत असतें ॥ २ ॥ एक बोकड आपल्याला आवडणारे पदार्थ कोठें मिळतील हें पाहाण्यासाठीं रानांत इकडेतिकडे फिरत असतां एक शेळी आपल्या कर्मानुसार विहिरींत पडलेली तेथें त्याच्या दृष्टीस पडली ॥३॥ तेव्हां तिला वर काढण्याची युक्ति करावी असा विचार करून त्या विषय-लंपट बोकडानें आपल्या शिंगांनीं विहिरीचा कडा खोदून बाहेर येण्यासाठीं वाट केली ॥ ४ ॥ मग ती चपलांगी शेळी विहिरींतून बाहेर आली आणि तिचें त्या बोकडावर प्रेम बसलें. तिनें त्याला पति म्हणून वरिलें आणि तें पाहून दुसऱ्या शेळ्यांनाहि पतीची इच्छा झाली ॥ ५ ॥ त्याप्रमाणें त्या लठ्ठ दाढीवाल्या बोकडाला त्यांनींहि वरिलें आणि स्त्रियांना संतुष्ट करण्यांत तो कुशल आहे आणि विषय भोगण्यालाहि समर्थ आहे असें पाहून त्याच्या-वर त्या फार प्रेम करूं लागल्या. तो एकटा बोकड त्या अनेक शेळ्यांची इच्छा पूर्ण करी आणि त्यामुळें त्यांची भोगेच्छा वाढत गेली. याप्रमाणें भोगासक्त होऊन तो त्यांच्या समागमें रमत असतां त्याला आपण कोण याचें भान राहिलें नाहीं ॥ ६ ॥ त्या दुसऱ्या शेळ्यांतील एक शेळी त्याची अत्यंत आवडती होती. तिच्याशीं तो क्रीडा करितो हें पाहून त्या पहिल्या विहिरींतील शेळीला त्याचें तें कृत्य सहन झालें नाहीं ॥ ७ ॥ ती त्याला, मित्रासारखा दिसणारा, पण अंतःकरणाचा दुष्ट, केवळ विषयलंपट व क्षणमात्र इंद्रियतृप्तीकरितांच प्रेम दाखविणारा असें मानूं लागली आणि दुःखानें त्याचा त्याग करून आपल्या स्वामीकडे गेली. ॥ ८ ॥ ती गेली असतां तो स्त्रीलंपट बोकड दीन होऊन बें बें शब्द करीत तिची समजूत घालण्यासाठीं तिच्या मागोमाग धांवला; पण वाटेंत कांहीं त्याला तिची समजूत घालतां आली नाहीं ॥ ९ ॥ त्या शेळीचा स्वामी कोणी ब्राह्मण होता. त्यानें हा सर्व प्रकार लक्षांत घेऊन त्या बोकडाचा लोंबणारा वृषणत्व तोडून टाकिला; पण त्याला तो पुनः जड-विण्याची विद्या माहीत असल्यामुळें आपल्या शेळीच्या कार्यासाठीं त्यानें तो पुनः लावून दिला ॥ १० ॥ याप्रमाणें वृषण पुनः लाविल्यावर तो बोकड त्या विहिरींत सांपडलेल्या शेळीसह रमूं लागला. ययाति म्हणतो,—हे देवयानि, तो बोकड किती तरी काळ तिच्यासह भोग भोगीत आहे; पण अजूनहि त्याची तृप्ति झालेली नाहीं ॥ ११ ॥ हे सुंदरि, त्याचप्रमाणें

मींसुद्धां दीन होऊन तुझ्या प्रेमपाशांत जखडून गेलों आहें आणि तुझ्या मोहकपणाला वश होऊन स्वतःलाहि विसरलों आहें ॥ १२ ॥ या पृथ्वीवर तांदूळ, गहूं इत्यादि धान्यें आहेत, सोनें, रुपें आदि संपत्ति आहे किंवा पशु, स्त्रिया इत्यादि उपभोग्य पदार्थ आहेत; पण ज्या पुरुषाचें मन केवळ विषयलालसेनें घेरलें आहे त्याच्या मनाला या वस्तूंपैकीं एकहि वस्तु संतोष देऊं शकत नाहीं ॥ १३ ॥ विषयवासना ही विषयांच्या उपभोगानें कधींहि तृप्त होत नाहीं; तर उलट असें होतें कीं, जसा अग्नि तुपाच्या योगानें न विझतां अधिकच पेट घेतो, तशी विषयवासना ही विषयांच्या उपभोगानें कमी न होतां अधिकाधिक वाढतच जाते ॥ १४ ॥ पण जेव्हां मनुष्य कोणत्याहि प्राण्यांविषयीं रागद्वेष आदिकरून दुष्ट विचार बाळगीत नाहींसा होऊन सर्वांवर सारख्या दयार्द्रदृष्टीनें पाहूं लागतो, तेव्हां मात्र त्याला सर्वत्र दिशा सुखकारक होतात ॥ १५ ॥ अल्पमतीच्या लोकांना भोगेच्छा सोडून देणें अत्यंत कठीण आहे. मनुष्य वृद्ध होऊन दुर्बळ झाला, तरी ती इच्छा दुर्बळ होत नाहीं. यास्तव ज्याला सुख पाहिजे असेल त्यानें साऱ्या दुःखांचें मूळ अशी ही भोगेच्छा सत्वर टाकून दिली पाहिजे ॥ १६ ॥ प्रत्यक्ष माता, बहीण किंवा मुलगी असली तरी तिच्यासह एकान्तीं आसनावर बसूं नये. कारण इंद्रियें हीं मोठीं बळकट असून ज्ञानी माणसालाहि आपल्याकडे खेंचून घेतात ॥१७॥ मींच पाहा, सारखा हजार वर्षें विषयोपभोग घेत आहें; पण दिवसानुदिवस माझी त्याविषयींची इच्छा वाढतच आहे ॥ १८ ॥ यास्तव आतां तिचा मीं त्याग करतों आणि मन परब्रह्माकडे लावून व सुखदुःखादि द्वंद्वापासून अलिप्त होऊन निरहंकार असा रानांत पशूंच्या समागमांत राहण्याचें ठरवितों ॥ १९ ॥ जें कांहीं दिसत आहे किंवा ऐकूं येत आहे, तें सर्व संसारचक्रांत लोटून आत्मस्वरूपाचा लोप करणारें आहे, ही गोष्ट जाणून ज्ञात्या पुरुषानें त्याचें चिंतन करण्याचें किंवा उपभोग घेण्याचें सोडून द्यावें ॥ २० ॥ देवयानीला असें सांगून ययातीनें पूरूचें तारुण्य पूरूला परत दिलें आणि त्याच्यापासून आपली जरा घेऊन तो निरिच्छ झाला ॥ २१ ॥ त्यानें आग्नेयीचा प्रदेश द्रुह्यूला दिला, दक्षिण भाग यदूला दिला, पश्चिम भाग तुर्वसूला दिला आणि उत्तर प्रांताचा अधिकार अनूकडे सोंपविला ॥ २२ ॥ याप्रमाणें व्यवस्था केल्यावर त्यानें सर्व प्रजाजनांना अत्यंत प्रिय असलेल्या पूरूला सार्वभौमपदाचा अभिषेक केला आणि वडील भावांना त्याच्या तंत्रानें वागावयास सांगून तो वनांत निघून गेला ॥ २३ ॥ याप्रमाणें हजारों वर्षें भोगिलेले साही इंद्रियांचे विषय, पंख फुटलेला पक्षी जसा घरटें सोडितो त्याप्रमाणें ययातीनें एका क्षणांत सोडून दिले ॥ २४ ॥ तेथें सर्वसंगपरित्याग करून आत्मानुभव घेतल्यावर त्रिगुणात्मक अशा शरीरादिकांपासून तो मुक्त झाला आणि वासुदेवस्वरूपी निःसंग अशा परब्रह्माचा साक्षात्कार करून घेतल्यामुळें त्याला भगवद्भक्तांना मिळणारी उत्तम गति मिळाली ॥ २५ ॥ ययातीनें सांगितलेली कथा ऐकिल्यावर देवयानीला ती स्वतःचीच निंदा होय, व स्त्रीपुरुषांच्या प्रेमांतील गोंधळाची एक थट्टा म्हणून ययातीनें ती सांगितली, असें वाटलें ॥ २६ ॥ पाणपोईवर जसे कांहीं वाटसरू एकत्र होऊन मैत्री करतात, तोच प्रकार परमेश्वराधीन असलेल्या प्राण्यांसंबंधानें मायेनें घडवून आणिलेला असतो असें ती

समजली ॥ २७ ॥ तेव्हां तिनें ज्याप्रमाणें स्वप्नांतील भोग सोडावे त्याप्रमाणें सर्व विषयांचा संग सोडून दिला आणि श्रीकृष्णपरमात्म्याकडे चित्त लावून आपल्या शरीराचा त्याग केला ॥ २८ ॥ देहत्याग करतांना ती म्हणाली,—हे भगवन् वासुदेवा, तूं सकल सृष्टीचा निर्माणकर्ता आहेस, तुला नमस्कार असो. तूंच सर्व प्राण्यांच्या अंत:करणांत वास करीत असून शांत व सर्वव्यापी आहेस. तुला माझा नमस्कार असो ! ॥ २९ ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

# अध्याय २० वा

शुकाचार्य परीक्षित्राजाला सांगतात,—हे राजा, आतां पूरूच्या वंशाचें वृत्त मी तुला सांगतों. पूरुवंशांतच तुझा जन्म झाला असून आणखीहि अनेक श्रेष्ठ राजे व ब्राह्मणवंशीय पुरुष या वंशांत उत्पन्न झाले. ॥ १ ॥ पूरूचा पुत्र जन्मेजय व जन्मेजयचा प्रचिन्वान् असून प्रचिन्वानाचा प्रवीर, प्रवीराचा नमस्यु, आणि नमस्यूचा चारुपद हा होय ॥ २ ॥ चारुपदाला सुद्यु नांवाचा मुलगा होता व सुद्यूचा बहुगव नांवाचा पुत्र होता. बहुगवाचा संयाति, संयातीचा अंहयाति अहंयातीचा पुत्र रौद्राश्व म्हणून सांगितला आहे ॥ ३ ॥ रौद्रश्वाला ऋतेयु, कुक्षेयु, स्थाडिलेयु, कृतेयुक, जलेयु, संततेयु, धर्मेयु, सत्येयु, व्रतेयु आणि सर्वांत धाकटा म्हणून प्रसिद्ध असलेला वनेयु, असे दहा मुलगे घृताचीनामक अप्सरेपासून झाले. जशीं दहा इंद्रियें परमात्म्याच्या नियंत्रणांत असतात तसे हे दहा पुत्र पित्याच्या आज्ञेंत होते ॥ ४ ॥ ५ ॥ त्यांपैकीं ऋतेयूला रंतिभार हा पुत्र झाला. रंतिभाराला सुमति, ध्रुव आणि अप्रतिरथ असे तीन पुत्र झाले. त्यांपैकीं अप्रतिरथाला कण्व नांवाचा मुलगा होता ॥ ६ ॥ कण्वाचा पुत्र मेधातिथि नांवाचा असून मेधातिथीला प्रस्कण्व आदिकरून ब्राह्मणवंशीय पुत्र झाले. सुमतीचा पुत्र रैभ्य नांवाचा असून रैभ्याचा पुत्र दुष्यन्त म्हणून सांगितला आहे ॥ ७ ॥ हा दुष्यन्त एकदां मृगयेसाठीं वनांत गेला असतां कण्वाच्या आश्रमांत त्यानें प्रवेश केला. तेथें लक्ष्मीप्रमाणें आपल्या तेजानें आश्रमाला शोभा आणणारी एक स्त्री त्याच्या दृष्टीस पडली ॥ ८ ॥ परमेश्वराच्या मायेसारख्या त्या मोहक स्वरूपाच्या स्त्रीला पाहातांच दुष्यन्त तत्काळ मोहित झाला व त्याच्या समागमें जे कित्येक सैनिक होते त्यांच्या समक्षच तो तिच्याशीं बोलूं लागला ॥ ९ ॥ तिच्या दर्शनामुळें त्याला मोठा आनंद झाला आणि त्याला झालेले मृगयेचे श्रमहि दूर झाले. त्याच्या मनांत तिजविषयींच्या प्रेमाचा संचार झाला व त्यामुळें तो विव्हळ होऊन हास्ययुक्त मधुर शब्दांनीं तिला म्हणाला ॥ १० ॥ ' हे कमलनयने, हे मनमोहिनि, तूं कोण व कोणाची कन्या आहेस ? तसेंच या निर्जन अरण्यांत राहून तूं काय करावयाचें मनांत योजिलें आहेस ? ॥ ११ ॥ हे सुंदरि, मला तर उघड दिसतें कीं, तूं कोणी राजकन्या आहेस. कारण पूरूच्या कुळांत उत्पन्न झालेल्या पुरुषांचें मन अधर्माकडे केव्हांहि वळत नाहीं ॥ १२ ॥

दुष्यन्ताचें भाषण ऐकून ती शकुंतला म्हणाली,—' हे शूर राजा, मीं विश्वामित्राचीच कन्या असून माझी आई जी मेनका तिनें मला जन्मतःच अरण्यांत टाकून दिलें होतें. हा सर्व वृत्तान्त भगवान् कण्वमुनींना ठाऊक आहे. असो. आतां मीं आपलें काय काम करावें तें कृपा करून सांगा ॥ १३ ॥ हे कमलनयना, येथें बस; आणि आमच्या आतिथ्याचा स्वीकार कर. येथें पुष्कळ देवभात आहे. त्याचें तूं भोजन कर आणि वाटल्यास येथें राहण्यालाहि तुला आडकाठी नाहीं ॥ १४ ॥ शकुन्तलेचें हें उत्तर ऐकून दुष्यन्त म्हणाला,

' हे सुंदरि, कुशिकराजाच्या वंशांत तुझा जन्म झालेला असल्यामुळें, तुला हें योग्यच आहे. कारण राजकन्या ज्या असतात त्या आपल्याला अनुरूप असा पति स्वतःच निवडितात ॥ १५ ॥ दुष्यन्ताच्या या म्हणण्याला शकुन्तलेनें अनुमोदन दिलें असतां दुष्यन्तानें धर्माला अनुसरून तिचें गांधर्वविधीनेंच पाणिग्रहण केलें; कारण त्याला देश, काळ इत्यादिकांना अनुसरून कसें वागावें याचें चांगलें ज्ञान होतें ॥ १६ ॥ नंतर त्या अमोघवीर्य श्रेष्ठ राजानें शकुन्तलेला आपली पट्टराणी करून तिच्या ठिकाणीं गर्भस्थापना केली आणि दुसऱ्या दिवशीं उजाडल्यानंतर तो आपल्या नगराला निघून गेला. तो गेल्यावर योग्य काळ जातांच शकुंतलेला पुत्र झाला ॥ १७ ॥ त्या पुत्राचें जातकादि सर्व योग्य ते संस्कार त्या अरण्यांत कण्वमुनीनें केले. तो बालक क्रमशः मोठा होऊन मोठमोठ्या सिंहांना बलात्कारानें बांधून त्यांच्याशीं खेळूं लागला ॥ १८ ॥ तेव्हां त्या अत्यंत पराक्रमी अशा आपल्या पुत्राला घेऊन ती शकुंतला पतीच्या घरीं गेली. हा पुत्र श्रीहरीचा अंशावतारच होता ॥ १९ ॥ शकुंतला त्याला घेऊन दुष्यन्ताकडे आली, पण त्या निष्कलंक मातापुत्रांचा राजा स्वीकारच करीना. त्या वेळीं सर्व लोक ऐकत असतां आकाशवाणी झाली ॥ २० ॥ हे दुष्यन्ता, माता केवळ भात्याप्रमाणें म्हणजे चामड्याच्या पिशवीप्रमाणें असून पुत्र हा खरोखर पित्याचाच होय. ज्याच्यापासून तो झाला, त्याचाच तो असतो. यास्तव या पुत्राचा तूं स्वीकार कर, शकुंतलेचा अपमान करूं नकोस ॥२१॥ वंशवृद्धि करणारा पुत्र आपल्या पित्याचे नरकापासून रक्षण करितो. हे राजा, आणि या गर्भाचा तूंच संस्थापक आहेस. शकुंतला बोलली तें अगदीं खरें आहे ! ॥ २२ ॥ ही आकाशवाणी ऐकून दुष्यन्तानें शकुंतलेचा पुत्रासह स्वीकार केला. पुढें दुष्यंत मृत्यु पावल्यावर हा भरत नांवाचा त्याचा पुत्र चक्रवर्ती राजा झाला. त्यानें मोठी कीर्ति मिळविली. तो परमेश्वराचा अंशावतार असून त्याच्या माहात्म्याचें वर्णन पृथ्वीवर सर्वत्र गाइलेलें ऐकूं येतें ॥ २३ ॥ त्याच्या उजव्या हातावर चक्राची खूण असून पायांवर कमळाच्या कळ्याचें चिन्ह होतें. सार्वभौम राजा म्हणून त्याला विधियुक्त महाभिषेक झाल्यावर त्या पराक्रमी भरतानें ममतेचा पुत्र जो दीर्घतमा याला पुरोहित करून अनेक यज्ञ केले. त्यांतील गंगेच्या कांठीं झालेल्या यज्ञांत त्यानें पंचावन्न यज्ञीय अश्वांचे बळि दिले, आणि यमुनेच्या कांठीं अठ्याहत्तर अश्व त्यानें यज्ञस्तंभांना बांधिले. या यज्ञांत भरतानें ऋत्विजांना विपुल दक्षिणा दिली. दुष्यंतपुत्र भरताचा यज्ञाग्नि अत्यंत योग्य अशा भूमीवर प्रज्वलित झाला होता आणि त्या प्रसंगीं एक सहस्र ब्राह्मणांनीं एकेकाला एकेक बद्र गाई याप्रमाणें दक्षिणा वांटून घेतली ॥ २४ ॥ ॥२५॥ ॥ २६ ॥ याप्रमाणें एकशें तेहतीस अश्वमेध यज्ञ करून दुष्यंतपुत्र भरतानें सर्व राजांना आश्चर्यचकित केलें आणि तेणेंकरून मायासमुद्र तरून तो देवांचाहि गुरु जो श्रीहरि त्याच्या स्थानीं गेला ॥ २७ ॥ भरतानें मष्णार नांवाचें एक मोठें कृत्य केलें व त्यांत शुभ्र दातांचे व काळ्या वर्णाचें चौदा लक्ष हत्ती सोन्यानें मढवून त्यानें दान दिले ॥ २८ ॥ हें भरताचें कृत्य फारच मोठें होय; आणि ज्याप्रमाणें केवळ बाहूंच्या साहाय्यानें स्वर्ग मिळवितां येत नाहीं, त्याप्रमाणें इतर

राजांना तें पूर्वी कधीं करिता आलें नाहीं व पुढेंहि कोणाला करतां येणार नाहींच ॥२९॥ भरतानें दिग्विजयहि केला आणि त्या प्रसंगीं किरात, हूण, यवन, आन्ध्र, कंक, खश आणि शक या ब्राह्मणविरोधी सर्व म्लेंच्छ राजांचा त्यानें वध केला ॥ ३० ॥ पूर्वी सामर्थ्यवालें दानवांनीं देवांचा पराभव करून देवस्त्रियांना आपल्या पाताळांतील घरांत नेऊन ठेविलें होतें व तेथें त्या बंदींत असत. भरतानें त्या दानवांना मारून त्या देवस्त्रियांना परत आणितें ॥ ३१ ॥ भरत राजा राज्य करीत असतां त्याच्या प्रजेला जें जें कांहीं पाहिजे असे, न् सर्व पृथ्वी व अंतरिक्ष यांपासून मिळत असे. भरतानें सत्तावीस हजार वर्षें सर्व पृथ्वीवर राज्य केलें ॥ ३२ ॥ आणि शेवटीं लोकपालांचें ऐश्वर्य, चक्रवर्ती राजाची संपत्ति, अकुंठित राज्याधिकार, फार काय पण प्राण देखील मिथ्या होत असें जाणून त्यानें त्या सर्वांचा संग सोडून दिला ॥ ३३ ॥ शुकाचार्य परीक्षितीला सांगतात,—हे राजा, भरताला विदर्भकुळांत जन्मलेल्या तीन स्त्रिया असून त्या सर्व त्याच्या आवडत्या होत्या; पण आपणांस पुत्र झाले असतां, हे मला अनुरूप नाहींत असें राजानें जर म्हटलें तर तो आपला त्याग करील कीं काय, या भीतीनें त्यांनीं पुत्रांना मारून टाकिलें ॥ ३४ ॥ याप्रमाणें भरताचा वंश खुंटण्याचा प्रसंग आला असतां त्यानें पुत्रप्राप्तीसाठीं मरुत्स्तोम नांवाचा यज्ञ केला आणि त्यामुळें मरुत्‌देवांनीं भरद्वाज हा पुत्र त्याला दिला ॥ ३५ ॥ या भरद्वाजाची कथा अशी आहे कीं, बृहस्पतीचा भाऊ जो उतथ्य, त्याची पत्नी ममता गरोदर असतां तिच्याशीं मैथुन करण्यास बृहस्पति सिद्ध झाला; त्या वेळीं आंतील गर्भानें त्याचा निषेध केला असतां बृहस्पतीनें त्याला आंधळा होशील असा शाप देऊन ममतेशीं मैथुन केलें आणि वीर्य सोडिलें ॥ ३६ ॥ ( हें वीर्य गर्भांतील बालकानें पायानें बाहेर लोटून दिलें असतां भूमीवर पडलें आणि त्यापासून तत्काळ पुत्र निर्माण झाला ) हा पुत्र पतीशिवाय इतरांपासून जन्मल्यामुळें पति आपला त्याग करील या भीतीनें ममता त्याला टाकून देऊं लागली. तेव्हां त्याचें नांव दर्शविणारा श्लोक देवांनीं तिला म्हणून दाखविला ॥ ३७ ॥ ' हे अज्ञानी स्त्रिये, हा पुत्र तूं आणि मी अशा आपणां दोघांपासून उत्पन्न झालेला आहे. तरी याचें तूं पोषण कर. ' ' हे बृहस्पते, तूंच याचें पोषण कर ! कारण हा आपणां दोघांपासून झाला आहे,' असें बृहस्पति आणि ममता यांनीं म्हणजे त्या बालकाच्या मातापित्यांनीं एकमेकांना सांगितलें आणि त्याला टाकून तीं दोघेंहि निघून गेलीं. यामुळें या मुलाला भरद्वाज असें म्हणूं लागले ॥ ३८ ॥ याप्रमाणें देवांनीं सांगितलें असतांहि हा पुत्र ( व्यभिचारोत्पन्न असल्यामुळें ) व्यर्थ होय, असें मानून ममतेनें त्याचा त्याग केला. मग देवांनीं त्याचें पोषण करून भरताचा वंश नष्ट होऊं लागला असतां तो त्याच्या स्वाधीन केला ॥ ३९ ॥

**अध्याय विसावा समाप्त**

---

# अध्याय २१ वा

शुकाचार्य परीक्षितीला सांगतात,– हे राजा, भरद्वाजाला वितथ असेंहि म्हणत. त्याचा पुत्र मन्यु आणि मन्यूला ब्रहत्क्षत्र, जय, महावीर्य, नर आणि गर्ग असे पांच पुत्र झाले. त्यांत नराचा पुत्र संकृति नांवाचा होता ॥ १ ॥ हे राजा, संकृतीला गुरु आणि रंतिदेव असे पुत्र होते. रंतिदेवाची कीर्ति पृथ्वीवरच नव्हे तर स्वर्गांतहि गाण्यांत येते. वित्ताचा व्यय होणारच, तेव्हां तें देत असावें, असा रंतिदेवाचा निश्चय असे. त्यामुळें स्वतः भूक लागली असतांहि जें मिळेल तें कोणी मागितल्यास तो देऊन टाकी. एकदां अशा रीतीनें तो अगदीं निष्कांचन झाला आणि कुटुंबासह त्याच्यावर मोठा प्रसंग आला; पण त्यानें धैर्य सोडलें नाहीं ॥ २ ॥ ३ ॥ त्याला अठ्ठेचाळीस दिवस पाणीहि प्यावयास मिळालें नाहीं; अशा स्थितीत असतां एके दिवशीं सकाळीं तूप, खीर, सांजा व पाणी हीं त्याच्या पुढें आलीं. कुटुंबावर अशी अपत्ति आली असतांहि, पुढे आलेले पदार्थ रंतिदेव खाऊं लागणार,इतक्यांत भूक व तहान लागून अगदीं व्याकुळ झाल्यामुळें कांपत असलेला एक ब्राह्मण तेथें येऊन पोंचला ॥ ४ ॥ ५ ॥ रंतिदेवानें त्या ब्राह्मणाचा आदर करून श्रद्धेनें त्या अन्नाचा विभाग त्याला अर्पण केला; कारण सर्वत्र श्रीहरि भरलेला आहे अशी त्याची भावना दृढ होती. ब्राह्मण तें अन्न भक्षण करून तेथून निघून गेला ॥ ६ ॥ शुकाचार्य सांगतात,–हे राजा, तो ब्राह्मण निघून गेल्यावर रंतिदेव उरलेला अन्नभाग घेऊन खाऊं लागणार, तोंच दुसरा एक शूद्र अतिथि तेथें आला. तेव्हांहि रंतिदेवाच्या मनांत श्रीहरि असल्यामुळें त्या अन्नाचा भाग त्यानें त्या शूद्राला काढून दिला ॥ ७ ॥ शूद्र तें अन्न खाऊन गेल्यावर कांहीं कुत्रे बरोबर घेऊन आणखी एक अतिथि आला आणि 'हे राजा, मी व माझे हे कुत्रे फार भुकेले आहेत, आम्हांला अन्न दे !' असें काकुळतीनें म्हणूं लागला ॥ ८ ॥ रंतिदेवानें त्याचाहि आदर करून उरलेलें अन्न मोठ्या बहुमानानें त्याला अर्पण केलें आणि त्याला व त्याच्या कुत्र्यांना नमस्कार केला ॥ ९ ॥ आतां त्याच्याजवळ पाणी तेवढें राहिलें होतें व तेंहि एकट्याला पुरेल एवढेंच सरासरी होतें. तें तो प्यावयास लागणार, इतक्यांत तेथें एक चांडाळ आला आणि 'हे राजा, मीं चांडाळ आहें, मला पाणी दे.' असें म्हणाला ॥ १० ॥ तो चांडाळ अगदीं दीनवाणीनें ते शब्द बोलला आणि ते बोलतांनाहि त्याला फार कष्ट झाले, असें पाहून राजाला दया आली आणि त्याच्या कोमल मनाला अतिशय दुःख होऊन तो त्या चांडाळाशीं गोड शब्दांनीं बोलूं लागला ॥ ११ ॥ तो म्हणाला,—'अष्टसिद्धि ज्यांत राबत आहेत असें श्रेष्ठ स्थान परमेश्वरापासून मिळवावें अशी माझी महत्त्वाकांक्षा नाहीं. मला मोक्षाचीहि गरज नाहीं. तर सर्व प्राण्यांच्या अंतःकरणांत राहून त्यांचें दुःख मीं भोगावें व तेणेंकरून ते दुःखमुक्त व्हावेत, अशी माझी इच्छा आहे ॥ १२ ॥

जगावयाची इच्छा असल्यामुळें दीनवाणीनें अन्नपाणी मागणाऱ्या प्राण्याला अन्नदान व जलदान केल्यामुळें माझी भूक व तहान सर्व नाहींशी झाली. माझें शरीरहि स्वस्थ झालें. माझें दैन्य, माझे श्रम, माझा शोक, उद्वेग व मोह हींहि सर्व दूर झालीं आहेत ॥१३॥ असें म्हणून पाण्यावांचून मरणाऱ्या त्या रंतिदेवानें सहज धैर्यानें तें पाणी चांडाळाला दिलें. इतका तो स्वभावाचा दयाळू होता ॥१४॥ रंतिदेवाची परीक्षा पाहाण्याकरितां श्रीहरीच्या मायेनें निर्मिलेले त्रिभुवनाचे स्वामी असे ब्रह्मादि देवच अतिथिरूपानें तेथें आले होते. फलाची इच्छा करणाऱ्यांना तें देणाऱ्या अशा त्या देवांनीं, रंतिदेव परीक्षेंत उतरला असें पाहून त्याला दर्शन दिलें ॥१५॥ पण रंतिदेवाला कसलीच अपेक्षा नव्हती, कारण तो पूर्ण निःसंग झालेला होता. त्यानें त्यांना नमस्कार करून मोठ्या भक्तीनें भगवान् वासुदेवालाहि नमस्कार केला ॥ १६ ॥ त्याचें लक्ष ईश्वराकडे लागलेलें असल्यामुळें त्याला दुसऱ्या कोणत्याच फलाची इच्छा नव्हती. हे राजा, स्वप्नांतील देखावा जागेपणीं जसा नाहींसा व्हावा, त्याप्रमाणें त्रिगुणात्मक मायेचा त्याच्या चित्तांत सर्वथा लोप झाला होता ॥१७॥ रंतिदेवाचे जे सेवक होते, तेहि त्याच्या संगतींत तसेच निरीच्छ होऊन परमेश्वरावर चित्त लावणारे योगी झाले ॥ १८ ॥ असो. मन्युपुत्र गर्गाला शिनिनामक पुत्र असून शिनीला गार्ग्य हा पुत्र झाला. गार्ग्य हा ब्राह्मण होय. म्हणजे क्षत्रियांमध्यें ब्राह्मणांचीहि उत्पत्ति झाली मन्युपुत्र महावीर्यापासून दुरितक्षय हा झाला. दुरितक्षयाला अरुणि, कवि आणि पुष्करारुणि हे तीन पुत्र होते. हे ब्राह्मणाच्या पदवीला गेले. मन्युपुत्र बृहत्क्षत्राला हस्ती नांवाचा पुत्र होता, त्यानें हस्तिनापुर शहर वसविलें ॥ १९ ॥ २० ॥ हस्तीला अजमीढ, द्विमीढ आणि पुरुमीढ असे पुत्र होते. अजमीढाचा वंश चालविणारे प्रियमध आदिकरून मुलगे ब्राह्मण असून त्याला आणखी बृहदिषु नांवाचाहि पुत्र होता. या बृहदिषूचा पुत्र बृहद्धनुनामक असून बृहद्धनूला बृहत्काय हा पुत्र झाला आणि बृहत्कायाला जयद्रथ झाला ॥ २१ ॥ २२ ॥ जयद्रथाचा पुत्र विशद आणि विशदापासून सेनजित् झाला. सेनजिताला रुचिराश्व, दृढहनु, काश्य आणि वत्स असे पुत्र होते ॥ २३ ॥ त्यांतील रुचिराश्वाला प्राज्ञ नांवाचा मुलगा असून प्राज्ञाचा पृथुसेन, व पृथुसेनाचा पार होय. पाराला नीप नांवाचा मुलगा होता व नीपाला शंभर पुत्र झाले ॥ २४ ॥ त्या नीपालाच * शुककन्या जी कृत्वी तिच्यापासून ब्रह्मदत्त नांवाचा मुलगा झाला. हा ब्रह्मदत्त योगी असून त्याला सरस्वतीनामक भार्येपासून विष्वक्सेन हा पुत्र झाला ॥ २५ ॥ विष्वक्सेनानें जैगीषव्याला योगशास्त्र शिकविण्यासाठीं त्या शास्त्रावर ग्रंथ रचिला. त्याला उदक्स्वन नांवाचा पुत्र असून उदक्स्वनाचा भल्लाद होय. एवढे बृहदिषूच्या वंशांतील राजे होत. असो ॥ २६ ॥ हस्तीच्या द्विमीढनामक पुत्राला यवीनर नांवाचा पुत्र होता व यवीनराचा

* हा शुक म्हणजे व्यासपुत्र भागवताचार्य शुकच होय. शुक खरोखर जन्मतःच निःसंग व वैराग्यशील असून तत्काल घरांतून निघून गेला होता; पण आपल्या विरहानें व्यास दुःखित झाला असें पाहून त्यानें छायाशुक निर्माण करून त्याच्याकडून गृहस्थाश्रम करविला अशी कथा आहे.

मुलगा कृतिमान् म्हणून सांगितला आहे. त्याला सत्यधृति असेंहि नांव होतें. कृतिमानाला दृढनेमि हा पुत्र झाला व दृढनेमीपासून सुपार्श्व झाला ॥ २७ ॥ सुपार्श्वाचा पुत्र सुमति आणि सुमतीचा सन्नतिमान् होय. सन्नतिमानाचा पुत्र कृति. यानें हिरण्यनाभापासून योगशास्त्र शिकून प्राच्यसामांच्या सहा संहिता गायिल्या व शिष्यांना पढविल्या. कृतीला नीप नांवाचा तीक्ष्णशस्त्रधारी पुत्र झाला. त्या नीपाला क्षेम्य, क्षेम्याला सुवीर, व सुवीराला रिपुंजय असे क्रमानें पुत्र होते ॥ २८ ॥ ॥ २९ ॥ रिपुंजयाला बहुरथ नांवाचा पुत्र होता. हस्तीचा तिसरा मुलगा जो पुरुमीढ त्याला संतति नव्हती. अजमीढाला प्रियमेधहि ब्राह्मण आणि बृहदिषु हा क्षत्रिय, यांशिवाय नलिनी नांवाच्या स्त्रीपासून नील नांवाचा पुत्र झाला होता.त्या नीलाचा पुत्र शांति॥ ३० ॥शांतीचा पुत्र सुशांति. सुशांतीचा पुरुज आणि पुरुजाचा अर्क होय. अर्कापासून भर्म्याश्व हा झाला. भर्म्याश्वाला मुद्गल आदिकरून पांच पुत्र होते ॥ ३१ ॥ त्यांतील इतरांचीं नांवें यवीनर, बृहदिषु, कांपिल्य आणि संजय अशीं होतीं. भर्म्याश्व पांच पुत्रांना पाहून म्हणाला, 'हे पांच पुत्र पांच प्रांतांचें रक्षण करण्यास पुरेसे आहेत.' यावरून त्यांना पुढें पांचाल असें नांव पडलें. या पांचांपैकीं मुद्गलापासून मौद्गल्य नांवाचें ब्राह्मणगोत्र उत्पन्न झालें ॥ ३२ ॥ ॥ ३३ ॥ मुद्गलाला दोन जुळीं मुलें झालीं, त्यांतील मुलगा तो दिवोदास आणि मुलगी ती अहल्या होय. अहल्येला गौतममुनीपासून शतानन्दनामक पुत्र झाला ॥ ३४ ॥ शतानंदाला धनुर्वेदांत निष्णात असा सत्यधृति नांवाचा पुत्र होता. सत्यधृतीचा पुत्र शरद्वत्. या शरद्वताचें वीर्य उर्वशीच्या दर्शनामुळें एका दर्भाच्या बेटावर पडलें आणि त्यापासून सुंदर जुळ्या मुलांचा जन्म झाला. शंतनुराजा मृगया करीत असतां त्याच्या दृष्टीस तीं मुलें पडलीं व त्याला दया येऊन त्यानें तीं आपल्या समागमें घेतलीं. त्यांतील मुलगा तो कृप होय व कन्या ती कृपी. ही कृपी पुढें द्रोणाचार्याची पत्नी झाली ॥ ३५ ॥ ३६ ॥

**अध्याय एकविसावा समाप्त**

# अध्याय २२ वा

शुकाचार्य परीक्षितीला सांगतात,—हे राजा, मुद्गलपुत्र दिवोदासाला आणखी मित्रेयु नांवाचा पुत्र होता व त्या मित्रेयूचा पुत्र च्यवन नांवाचा होता. च्यवनापासून सुदास, त्यापासून सहदेव, सहदेवापासून सोमक आणि सोमकापासून जन्तु असा वंशविस्तार झाला ॥ १ ॥ जन्तूला शंभर पुत्र असून त्यांतील धाकटा पृषत् नांवाचा होता. त्या पृषताच्या द्रुपदनामक पुत्राला द्रौपदी ही कन्या आणि धृष्टद्युम्न आदिकरून पुत्र झाले ॥ २ ॥ धृष्टद्युम्नाचा पुत्र धृष्टकेतु. इतके हे भर्म्याश्वाच्या वंशांतील पंचाल नांवाचे राजे होत. अजमीढाचा आणखी ऋक्ष नांवाचा जो मुलगा होता त्यापासून संवरण हा झाला ॥ ३ ॥ संवरणाला सूर्यकन्या तपतीपासून कुरु हा पुत्र होऊन तो पुढें कुरुक्षेत्राचा राजा झाला. कुरूचे परीक्षित्, सुधनु, जह्नु व निषधाश्व असे पुत्र होते ॥ ४ ॥ त्यांत सधनूपासून सुहोत्र, सुहोत्रापासून च्यवन, च्यवनापासून कृति, कृतीपासून उपरिच वसु आणि त्या वसूपासून बृहद्रथ आदिकरून पुत्र झाले ॥५॥ त्यांतील इतरांचीं नांवें कुशांब, मत्स्य, प्रत्यग्र, चेदिप इत्यादि असून ते चेदिदेशाचे राजे होते. बृहद्रथापासून कुशाग्र झाला. कुशाग्राचा पुत्र ऋषभ. ऋषभाला सत्यहित नांवाचा पुत्र झाला व सत्यहिताचा पुत्र पुष्पवान् होय. पुष्पवानाला जंबु नांवाचा मुलगा होता. बृहद्रथाला दुसऱ्या पत्नीपासून मुलांचीं दोन शकलें झालीं ॥ ६ ॥ ७ ॥ मातेनें तीं शकलें म्हणून बाहेर फेंकून दिलीं असतां जरा नांवाच्या राक्षसीनें तीं एकत्र जुळविलीं आणि 'जग, जग !' असें म्हणूं लागली. तोच जरासंध म्हणून पुत्र झाला ॥ ८ ॥ त्या जरासंधापासून सहदेव झाला. सहदेवापासून सोमापि झाला आणि सोमापीपासून श्रुतश्रवा झाला. कुरुपुत्र परीक्षिताला संततिच नव्हती. कुरूचा आणखी पुत्र जो जन्हु त्याला सुरथ नांवाचा पुत्र होता ॥ ९ ॥ सुरथापासून विदूरथ झाला आणि विदूरथापासून सार्वभौम झाला. सार्वभौमाचा पुत्र जयसेन हा असून जयसेनाचा राधिक आणि राधिकाचा अयुत हा होता ॥ १० ॥ अयुतापासून क्रोधन झाला आणि क्रोधनापासून देवातिथि झाला. देवातिथीचा पुत्र ऋष्य, ऋष्याचा दिलीप आणि दिलीपाचा पुत्र प्रतीप होय ॥ ११ ॥ प्रतीपाला देवापि, शंतनु आणि बाल्हीक असे तीन पुत्र होते. त्यांतील देवापि हा पित्यानें राज्य दिलें असतां तें सोडून वनांत निघून गेला ॥ १२ ॥ शंतनु हा पूर्वजन्मीं महाभिष नांवाचा राजा असून ज्या ज्या मनुष्याला तो हातांनीं स्पर्श करी, तो तो म्हातारा असला तरी तरुण होई ॥ १३ ॥ याप्रमाणें कार्य केल्यामुळें त्याच्या मनाला उत्तम समाधान होई आणि म्हणून शंतनु म्हणजे कल्याण करणारा असें त्याचें नांव पडलें. त्याच्या राज्यांत एकदां बारा वर्षें पाऊस मुळींच पडला नाहीं ॥ १४ ॥ तेव्हां असें कां झालें म्हणून शंतनूनें ब्राह्मणांना विचारलें असतां, ते म्हणाले, 'राजा तुझा वडील भाऊ राज्याचा स्वामी असतां तूं त्याचा स्वीकार करून परिवेत्ता झाला आहेस. तरी हें नगर व सर्व राष्ट्र यांचा उत्कर्ष

व्हावयास पाहिजे असेल, तर त्या वडील भावाला सत्वर राज्य दे !' ।। १५ ।। याप्रमाणें ब्राह्मणांनीं सांगितलें असतां शंतनूनें देवापीची समजूत करून त्यानें राज्य स्वीकारावें असा प्रयत्न केला; पण शंतनूच्या मंत्र्यानें + पूर्वींच देवापीकडे कांहीं ब्राह्मण पाठवून त्याच्याकडून मोहक भाषणांनीं देवापीला वेदांपासून भ्रष्ट केलें होतें. शंतनु त्याची समजूत करीत असतां देवापि वेदांविरुद्ध बोलून त्यांची निंदा करूं लागला व तत्क्षणींच शंतनूच्या राज्यांत पाऊस पडला. हा देवापि योगसमाधि लावून कलाप नांवाच्या गांवीं राहिला आहे ।। १६।। ।। १७ ।। कलियुगांत सोमवंश नष्ट होईल त्या वेळीं पुनः कृतयुगाला आरंभ होतांना त्याचें हा पुनरुज्जीवन करील. शंतनूचा भाऊ जो बाल्हीक त्यापासून सोमदत्त झाला. सोमदत्ताला भूरि, भूरिश्रवा आणि शल, असे पुत्र होते. शंतनूला गंगेपासून आत्मज्ञानी भीष्म हा पुत्र झाला. हा सर्व धर्म जाणणारा, श्रेष्ठ भगवद्भक्त असून मोठा ज्ञानी होता ।।१८।। १९ ।। वीरसमुदायामध्यें श्रेष्ठ अशा परशुरामालाहि त्यानें युद्धांत आपल्या पराक्रमानें संतुष्ट केलें. शंतनूला कोळ्याची मुलगी जी सत्यवती तिच्यापासून चित्रांगद नांवाचा मुलगा झाला ।। २० ।। त्याचा धाकटा भाऊ विचित्रवीर्य हा होय. चित्रांगद नांवाच्या गंधर्वाशीं युद्ध करीत असतां शंतनूचा पुत्र चित्रांगद मरण पावला. सत्यवतीला शंतनूशीं विवाह करण्यापूर्वी पराशरऋषीपासून भगवान् श्रीहरीचा अंश असा व्यास हा पुत्र झाला होता ।। २१ ।। शुकाचार्य सांगतात, त्या पुत्रानें वेदांचें रक्षण केलें व तो कृष्णद्वैपायन नांवानें प्रसिद्ध आहे. हे राजा, मीं हें भागवत त्याच्यापासून शिकलों. आपले दुसरे शिष्य जे पैल, वैशंपायन इत्यादि होते त्यांना सोडून भगवान् बादरायण-व्यासानें हें गुह्य ज्ञान मलाच सांगितलें; कारण मीं त्याचा पुत्र असून शांत स्वभावाचा आहें. असो. विचित्रवीर्यानें काशिराजाच्या दोन कन्यांशीं विवाह केला ।।२२।। २३ ।। त्यांचीं नांवें अंबा व अंबालिका अशीं असून त्यांना स्वयंवराच्या प्रसंगीं बलात्कारानें पकडून आणिलें होतें. विचित्रवीर्य त्यांच्यावर अत्यंत आसक्त झाल्यामुळें क्षयी बनून मरण पावला ।। २४ ।। तो संततिविहीन मरण पावल्यामुळें त्याच्या आईनें म्हणजे सत्यवतीनें व्यासाला आपल्या भावाच्या स्त्रियांच्या ठिकाणीं संतति उत्पन्न करण्यास सांगितलें व त्याप्रमाणें व्यासानें त्यांच्या ठिकाणीं धृतराष्ट्र, पांडु आणि विदुर हे पुत्र निर्माण केले ।। २५ ।। त्यांत धृतराष्ट्राला गांधारीपासून शंभर पुत्र झाले. त्यांतील वडील पुत्र दुर्योधन होय. त्याला एक दुःशला नांवाची कन्याहि होती ।। २६ ।। पांडूला शाप झाल्यामुळें स्त्रीगमन वर्ज्य होतें. त्यामुळें त्याच्या कुंतीनामक स्त्रीचे ठिकाणीं यम, वायु आणि इंद्र या देवांनीं युधिष्ठिर, भीम आणि अर्जुन असे तीन महापराक्रमी पुत्र निर्माण केले ।। २७ ।। तसेंच त्याच्या माद्रीनामक स्त्रीच्या पोटीं नासत्य आणि दस्र या अश्विनीकुमारांपासून नकुल व सहदेव हे पुत्र झाले. या पांच पांडवांना द्रौपदीपासून पांच पुत्र झाले. शुकाचार्य सांगतात, हे राजा, हे पुत्र तुझे चुलते होत ।। २८ ।। त्यांत युधि-

---

+ या मंत्र्याचें अश्वराव ( श्रीधर ) देवापीनें वेदांची निंदा केल्यामुळें तो राज्याला अनधिकारी झाला व त्यामुळें शंतनूचा दोष जाऊन पाऊस पडला असा भाव. ( श्रीधर )

ष्ठिरापासून झालेल्या पुत्राचें नांव प्रतिविन्ध्य, भीमापासून झालेल्याचें श्रुतसेन, अर्जुनापासून झालेल्याचें श्रुतकीर्ति व नकुलापासून झालेल्याचें नांव शतानीक असें होतें ॥ २९ ॥ हे परीक्षित् राजा, सहदेवाच्या पुत्राचें नांव श्रुतकर्मा होतें. याशिवाय युधिष्ठिराला पौरवीनामक स्त्रीच्या पोटीं देवक हा पुत्र झाला. तसाच भीमसेनाला हिडिंबेपासून घटोत्कच आणि कालीपासून सर्वगत असे पुत्र झाले. सहदेवाची पत्नी विजया नांवाची पर्वतराजाची कन्या होती. तिच्यापासून त्याला सुहोत्र हा पुत्र झाला ॥ ३० ॥ ३१ ॥ नकुलाला करेणुमतीनामक स्त्रीपासून निरमित्र हा पुत्र झाला. त्याचप्रमाणें अर्जुनाला नागकन्या उलपीनामक स्त्रीपासून इरावत आणि मणिपूरच्या राजाच्या कन्येपासून बभ्रुवाहन असे पुत्र झाले. बभ्रुवाहन हा मणिपूरच्या राजाच्या मुलीचा मुलगा असतांहि त्याचा पुत्र म्हणून मानिलेला आहे ॥ ३२ ॥ हे राजा, अर्जुनाला याशिवाय सुभद्रेच्या पोटीं अभिमन्यु हा पुत्र झाला. हा तुझा पिता होय. त्यानें सर्व अतिरथ्यांना भारतीय युद्धांत जिंकिलें. हे राजा, त्यापासून उत्तरेच्य पोटीं तुझा जन्म झाला ॥ ३३ ॥ द्रोणपुत्र अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्राच्या तेजानें सर्व कुरुकुळ नष्ट होण्याचा प्रसंग आला असतां भगवान् कृष्णानें आपल्या प्रभावानें तुझी मृत्यूपासून सुटका करून तुला सजीव केलें ॥ ३४ ॥ हे राजा, तुला जनमेजय आदिकरून जे पुत्र झाले आहेत त्यांची नांवें श्रुतसेन, भीमसेन आणि पराक्रमशाली उग्रसेन अशीं होत ॥ ३५ ॥ तुला तक्षकापासून मृत्यु आला हें समजतांच जनमेजय रागानें सर्पसत्र करील आणि त्या अग्नींत सर्वांची खरोखर आहुति देईल ॥ ३६ ॥ तसाच तो कावषेयमुनीला पुरोहित करून अश्वमेध यज्ञ करील आणि सर्व पृथ्वी जिंकून दुसरेहि अनेक यज्ञ करील ॥ ३७ ॥ त्याला शतानीक नांवाचा पुत्र होईल. तो याज्ञवल्क्य मुनीपासून तीन वेदांतील कर्मकांड शिकून नंतर अस्त्रज्ञान व कर्ममार्गाचें ज्ञान प्राप्त करून घेऊन शौनक मुनीपासून ब्रह्मज्ञान मिळवून परब्रह्माची प्राप्ति करून घेईल ॥ ३८ ॥ शतानीकाचा पुत्र सहस्रानीक व त्याचा पुत्र अश्वमेधज असे होतील. अश्वमेधाचा पुत्र असीमकृष्ण आणि असीमकृष्णाचा नेमिचक्र होईल ॥ ३९ ॥ हस्तिनापुर नदीनें वाहून नेलें असतां नेमिचक्र कौशाम्बीनगरींत नीटपणें राहूं लागेल. नेमिचक्राचा पुत्र चित्ररथ आणि चित्ररथाचा कविरथ म्हणून सांगितला आहे ॥ ४० ॥ त्यानंतर कविरथापासून वृष्टिमान्, वृष्टीमानाचा सुषेण व सुषेणाचा महिपति, तसेच महीपतीचा सुनीथ, सुनीथाचा नृचक्षु आणि नृचक्षूचा सुखीनल असे पुत्र होतील ॥ ४१ ॥ सुखीनलापासून परिप्लव हा पुत्र व परिप्लवापासून मेधावी होऊन मेधावीला सुनय हा पुत्र होईल. पुढें सुनयापासून नृपंजय, नृपंजयापासून दूर्व आणि दूर्वापासून निमि असे पुत्र जन्मास येतील ॥ ४२ ॥ निमीपासून बृहद्रथ होईल आणि बृहद्रथापासून सुदाम आणि सुदामाला शतानीक, शतानीकाला दुर्दमन व त्याला वहीनर असे पुत्र होतील ॥ ४३ ॥ वहीनराला निमि, त्याला क्षेमक राजा होईल. हा ब्राह्मण व क्षत्रिय यांचा मिश्रवंश देव व ऋषि यांनीं आदर केलेला असा मी तुला सांगितला आहे ॥ ४४ ॥ कलियुगांत क्षेमकराजापर्यंत हा वंश चालेल व नंतर ह्या स्थानीं मागधवंशीय राजे येतील. ते तुला सांगतों ॥ ४५ ॥ सहदेवाला मार्जारि, त्याला श्रुतश्रवा, त्याला आयु,

त्याला निरमित्र असे पुत्र होतील ॥ ४६ ॥ त्या, निरमित्राला सुनक्षत्र, त्याला बृहत्सेन, त्याला कर्मजित्, त्याला सृतंजय, त्याला विप्र व त्याला शुचि असे पुत्र होतील ॥ ४७ ॥ नंतर क्षेम, त्याला सुव्रत, त्याला धर्मपुत्र, त्याला शम, त्याला द्युमत्सेन, त्याला सुमति व सुबल असे पुत्र होतील ॥ ४८ ॥ सुबालापासून सुनीथ, त्याला सत्यजित्, त्याला विश्वजित् व त्याला रिपुंजय असे पुत्र होऊन ते एक हजार वर्षे राज्य करितील ॥ ४९ ॥

**बाविसावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय २३ वा

शुकाचार्य परीक्षिताला म्हणतात,—हे राजा, ययातीचा अनु नांवाचा जो मुलगा होता त्याला सभानर, चक्षु आणि परोक्ष असे तीन पुत्र होते. त्यांतील सभानरापासून कालनर झाला व कालनराचा पुत्र सृंजय होय ॥ १ ॥ सृंजयाचा मुलगा जनमेजय जनमेजयाचा महाशील व महाशीलाचा महामना. महामनाला उशीनर आणि तितिक्षु असे दोन मुलगे होते ॥ २ ॥ शिबि, बन, शमि आणि दक्ष हे चार उशीनराचे पुत्र होते. वृषादर्भ, सुवीर, मद्र आणि कैकेय असे चारच मुलगे शिबीला होते. तितिक्षूला रुशद्रथ नांवाचा मुलगा असून, रुशद्रथाचा हेम, हेमाचा सुतपा आणि सुतप्याचा बलि होय ॥३॥ ॥४॥ अंग, वंग, कलिंग, तसेच सुह्म, पुंड्र, आंध्र नांवाचे मुलगे दीर्घतमस् नांवाच्या ऋषीपासून बलिराजाच्या स्त्रियांच्या पोटीं जन्मास आले ॥ ५ ॥ या सहा जणांनीं पूर्वेकडील सहा प्रांतांना आपलीं नांवें दिलीं. त्यांपैकीं अंगापासून खनपान हा पुत्र जन्मला आणि खनपानापासून दिविरथ झाला ॥६॥ त्या दिविरथाचा पुत्र धर्मरथ नांवाचा असून धर्मरथाला चित्ररथ हा पुत्र झाला. चित्ररथ निपुत्रिक असून त्याला रोमपाद असेंहि नांव होतें. तो दशरथाचा मित्र असल्यामुळें दशरथानें आपली शान्तानामक कन्या त्याला दिली व तिच्याशीं ऋष्यशृंगऋषीनें विवाह केला. रोमपादराजाच्या राज्यांत एकदां पाऊस पडेनासा झाला असतां या ऋष्यशृंगाला सुंदर स्त्रियांनीं राज्यांत आणिलें. ऋष्यशृंग हा हरिणीपासून झालेला असून तो आपल्या आश्रमाबाहेर येईना, म्हणून त्या स्त्रियांनीं त्याला नाचणें, गाणें, वाद्यवादन, नाना प्रकारचे हावभाव, आलिंगन, स्तुति इत्यादि प्रकारांनीं मोहित केलें व मग तो यावयास सिद्ध झाला. रोमपादराजा निपुत्रिक होता ( आणि त्याच्या राज्यांत पाऊस पडेना ) तेव्हां ऋष्यशृंगानें त्याच्याकडून इन्द्राला संतुष्ट करणारा पुत्रकामेष्टिनामक यज्ञ करविला व त्यामुळें रोमपादाला संतति झाली ( आणि त्याच्या राज्यांत पाऊसहि पडूं लागला ). निपुत्रिक अशा दशरथालाहि या ऋष्यशृंगामुळेंच संतति प्राप्त झाली. रोमपादाला चतुरंग नांवाचा पुत्र झाला व चतुरंगाला पृथुलाक्ष हा झाला ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ पृथुलाक्षाला बृहद्रथ, बृहत्कर्मा आणि बृहद्भानु असे पुत्र होते. त्यांतील पहिला जो बृहद्रथ त्यापासून बृहन्मना झाला व बृहन्मनापासून जयद्रथ झाला असें सांगितलें आहे ॥ ११ ॥ जयद्रथाला संभूति स्त्रीपासून विजय नांवाचा पुत्र झाला व विजयापासून धृतीचा जन्म झाला. धृतीला धृतव्रत नांवाचा मुलगा झाला. धृतव्रताचा सत्कर्मा आणि सत्कर्म्याचा अधिरथ होय. हा अधिरथ गंगानदीच्या तीरावर खेळत असतां पेटींत घालून वाहात असलेला बालक त्याच्या दृष्टीस पडला. हा बालक कुंती कौमार्यावस्थेंत असतांच तिला झाला असल्यामुळें तिनें टाकून दिलेला होता. अधिरथाला संतान; नव्हतें म्हणून त्यानें हा बालक आपला पुत्र केला ॥ १ २॥ ॥१ ३॥ हा बालक म्हणजे कर्ण होय. हा पुढें राजा झाला. त्याला वृषसेन नांवाचा पुत्र होता.

शुक्राचार्य सांगतात,–ययातीचा आणखी एक पुत्र जो द्रुह्यु त्याला बभ्रु नांवाचापुत्र झाला. या बभ्रुचा पुत्र सेतु होय ॥ १४ ॥ सेतूचा पुत्र आरब्ध, आरब्धाचा गांधार, गांधाराचा धर्म आणि धर्माचा धृत. धृताचा पुत्र दुर्मना व दुर्मनाचा प्रचेता. प्रचेत्याला शंभर पुत्र होते ॥ १५ ॥ ते म्लेंच्छांचे राजे होऊन उत्तर दिशेकडील प्रांतावर राज्य करूं लागले. ययातिपुत्र जो तुर्वसु त्याचा मुलगा वह्नि नांवाचा होता. वह्नीचा पुत्र भर्ग व भर्गाचा भानुमान् ॥ १६ ॥ भानुमानाला त्रिभानु हा पुत्र झाला आणि त्रिभानूलाहि करंधम झाला. हा मोठा उदारबुद्धीचा असून त्याला मरुतनामक पुत्र होता. हा मरुत निपुत्रिक असल्यामुळें त्यानें पौरववंशांतील दुष्यन्ताला पुत्र म्हणून घेतलें होतें ॥ १७ ॥ पण दुष्यन्ताला राज्याचा लोभ असल्यामुळें तो पुनः आपल्या वंशामध्यें येऊन मिळाला. शुक्राचार्य सांगतात,— हे राजा, आतां मी तुला ययातीचा वडील पुत्र जो यदु त्याच्या वंशाचा विस्तार सांगतों. या वंशाचें वृत्त मोठें पुण्यदायक असून मनुष्याच्या सर्व पापांचा नाश करतें. या यदूच्या वंशाचा वृत्तांत ऐकिला असतां मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होतो ॥ १८ ॥ १९ ॥ कारण या वंशांत भगवान् परमात्मा मनुष्यरूपानें अवतरला. सहस्रजित्, क्रोष्टा, नल आणि रिपु या नांवांनीं प्रसिद्ध असलेले चार मुलगे यदूला होते. त्यांतील सहस्रजिताचा मुलगा शतजित् हा होय. शतजिताला महाहय, वेणुहय आणि हैहय असे तीन मुलगे होते ॥२०॥ २१ ॥ हैहयाचा पुत्र धर्म,धर्माचा नेत्र आणि नेत्राचा कुन्ती. कुन्तीपासून सोहंजि जन्मला. सोहंजीचा पुत्र महिष्मान् व महिष्मानाचा भद्रसेन ॥२२॥भद्रसेनाला दुर्मद आणि धनक हे दोन पुत्र असून धनकाला कृतवीर्य, कृताग्नि, कृतवर्मा व कृतौजा असे मुलगे झाले॥२३॥यांत कृतवीर्याचा पुत्र अर्जुन हा सात द्वीपांचा राजा झाला. त्याने श्रीहरीचा अंश जो दत्तात्रेय त्याच्यापासून मोठ्या योगसिद्धि मिळविल्या होत्या ॥ २४ ॥ इतर राजांनीं यज्ञ, दान, तप, योग, विद्या, पराक्रम, दिग्विजय इत्यादि कांहीं केलें तरी त्यांना या कार्तवीर्य अर्जुनाची योग्यता प्राप्त होणें शक्य नाहीं ॥ २५ ॥ त्याचें सामर्थ्य पंचाऐशीं हजार वर्षेपर्यंत अस्खलित राहून त्यानें सहाहि इंद्रियांच्या विषयांचा इतका काळ सारखा उपभोग घेतला. ज्याच्या केवळ स्मरणानेंच नष्ट झालेलें द्रव्य परत मिळतें ॥ २६ ॥ त्याच्या हजारों पुत्रांपैकीं परशुरामाबरोबर झालेल्या युद्धांतून पांचच जिवंत राहिले. जयध्वज, शूरसेन, वृषभ, मधु आणि ऊर्जित अशीं त्यांचीं नांवें होतीं ॥ २७ ॥ त्यांत जयध्वजापासून ताळजंघ हा जन्मला. तालजंघाला शंभर मुलगे झाले. हें तालजंघ नांवाचें क्षत्रियकुल और्वाचा तेजस्वी शिष्य जो सगर त्यानें नष्ट केलें ॥ २८ ॥ त्या शंभर पुत्रांपैकीं वीतिहोत्र हा वडील होय. सहस्रार्जुनाच्या मधुनामक पुत्राचा मुलगा वृष्णि म्हणून सांगितला आहे. त्या वृष्णीलाहि शंभर पुत्र होते व त्याच्याच नांवावरून त्या कुलाला वृष्णिकुल असें नांव मिळालें ॥ २९ ॥ हे राजा, या कुळांतील पुरुषांना माधव, वृष्णि व यादव अशीं तिन्ही नांवें आहेत. असो. यदुपुत्र जो क्रोष्टा त्याचा पुत्र वृजिवान्‌नामक होता. त्याचा पुत्र श्वाहीचा रुशेकु आणि रुशेकूचा चित्ररथ. चित्ररथापासून शशबिन्दु झाला व शशबिन्दूपासून महाभोज झाला. हा महाभोज

फार योग्यतेचा असून महायोगी होता ॥ ३० ॥ ३१ ॥ त्याच्याजवळ चौदा मोठीं * रत्नें असून तो सार्वभौम राजा होता व त्याचा केव्हांहि कोणी पराजय केला नाहीं. त्याला दहा लक्ष स्त्रिया असून प्रत्येकीपासून एक एक लक्ष असे शंभर कोटी पुत्र झाले. त्यांतील सहा मुख्य असून त्या सहांमध्यें वडील जो पृथुश्रवा त्याला धर्म नांवाचा मुलगा होता, धर्माचा पुत्र उशना नांवाचा असून त्यानें शंभर अश्वमेधयज्ञ केले. उशनाचा पुत्र रुचक. रुचकाला पांच पुत्र होते. त्यांचीं नांवें सांगतों तीं ऐक ॥ ३२ ॥ ३३ ॥ ३४ ॥ पुरुजित्. रुक्म, रुक्मेषु, पृथु आणि ज्यामघ अशीं तीं होत. ज्यामघाला पहिल्या स्त्रीपासून संतति होईना, तरी त्याची पत्नी जी शैब्या तिच्या भीतीनें त्यानें दुसरी भार्या केली नाहीं. त्यानें शत्रुकुलांतून भोज्या नांवाची कन्या हरण करून आणिली होती; पण ती रथावर असतांच तिला पाहून शैब्येला संताप आला व ती पतीला म्हणाली, ॥ ३५ ॥ ३६ ॥ 'अरे कपट्या, रथांतील ह्या माझ्या जागीं ही कोण स्त्री आणून बसविली आहेस?' पत्नीचे हे रागाचे शब्द ऐकून ज्यामघ म्हणाला 'अगे, ही तुझी सून होय.' हें ऐकून शैब्येनें हंसत हंसत पतीला विचारिलें, 'अहो, मी निपुत्रिक असून मला कोणी सवतहि नाहीं. असें असतां ही माझी सून म्हणणें असें जुळेल?' यावर ज्यामघानें उत्तर केलें, 'हे देवि, तुला जो पुत्र होईल त्याच्यासाठीं ही उपयोगी पडेल!' ॥ ३७ ॥ ३८ ॥ या ज्यामघाच्या बोलण्यास सारे देव आणि पितर यांनीं अनुमोदन दिलें आणि तदनुसार शैब्येला गर्भहि राहिला. मग योग्य काळीं ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तो विदर्भ या नांवानें प्रसिद्ध असून त्यानें पुढें पित्यानें सून म्हणून म्हटलेल्या या साध्वी कन्येचें पाणिग्रहण केलें ॥ ३९ ॥

---

* रत्न म्हणजे, जातौ जातौ यदुत्कृष्टं तत्द्रत्नमभिधीयते' याअर्थानें प्रत्येक जातींतील श्रेष्ठ वस्तु. हीं रत्नें चौदा प्रकारचीं पुराणांत सांगितलीं आहेत.

गजवाजिरथस्त्रीपुंनिधिमाल्यांबरद्रुमाः । शक्तिपाशं मणिं छत्रं विमानानि चतुर्दश ॥

## तेविसावा अध्याय समाप्त

# अध्याय २४ वा

शुकाचार्य परीक्षित् राजाला सांगतात---हे राजा, विदर्भ राजाला आपल्या त्या पत्नीपासून कुश व क्रथ या नांवांचे दोन आणि विदर्भकुळाला आनंद देणारा तिसरा रोमपाद असे पुत्र झाले ।। १ ।। रोमपादाचा मुलगा बभ्रु व बभ्रूचा कृती नांवाचा पुत्र होता. हे राजा, कृतीचा पुत्र उशिक आणि उशिकापासून चेदि झाला. चेदीचे पुत्र चैद्यादिक होत ।। २ ।। विदर्भाचा दुसरा पुत्र क्रथ. त्याला कुंति नांवाचा मुलगा होता. कुंतीपासून धृष्टि जन्मला आणि धृष्टीला निर्वृतिनामक पुत्र झाला. निर्वृतीला दशार्ह नांवाचा मुलगा झाला आणि दशार्हाचा पुत्र व्योम होय ।। ३ ।। व्योमापासून जीमूत झाला. जीमूताचा पुत्र विकृति आणि विकृतीचा भीमरथ. भीमरथाला नवरथ नांवाचा पुत्र झाला व नवरथाला दशरथ झाला ।। ४ ।। दशरथापासून शकुनि झाला व शकुनीचा मुलगा करंभि हा होय. करंभीचा पुत्र देवरात, देवराताचा देवक्षत्र देवक्षत्राचा मधु आणि मधूपासून कुरुवश कुरुवशापासून अनु असे पुत्र झाले ।। ५ ।। अनूला पुरुहोत्र नांवाचा पुत्र होता. पुरुहोत्राचा पुत्र आयु व आयूचा सात्वत. सात्वताला भजमान, भजि, दिव्य वृष्णि, देवावृध, अंधक आणि महाभोज असे सात पुत्र होते. शुकाचार्य परीक्षिताला सांगतात, —हे राजा, त्या सातांमध्यें भजमानाला निम्लोचि, किंकिण आणि धृष्टि असे तीन पुत्र एका स्त्रीपासून झाले आणि दुसऱ्या स्त्रीपासून शताजित्, सहस्राजित् व आयुताजित् असे तीन झाले ।। ६ ।। ७ ।। ८ ।। सात्वताचा आणखी एक पुत्र जो देवावृध त्याला बभ्रु नांवाचा मुलगा होता. देवावृध व बभ्रु या पितापुत्रांसंबंधानें दोन श्लोक लोक म्हणत असतात, आणि ते जवळच्या आणि दूरच्या अशा सर्व ठिकाणीं ऐकूं येतात ।। ९ ।। ते श्लोक असे —'बभ्रु हा सर्व माणसांत श्रेष्ठ असून देवावृध तर देवासारखा आहे. बभ्रु आणि देवावृध यांच्या उपदेशानें ज्यांना मोक्ष मिळाला असे सहा हजार ञ्याहत्तर पुरुष होऊन गेले.' सात्वताचा तिसरा पुत्र जो महाभोज तो मोठा धर्मशील होता. त्याच्या वंशांत भोज नांवाचें राजघराणें उत्पन्न झालें ।।१०।।११।। सात्वताच्या वृष्णिनामक पुत्राला सुमित्र नांवाचा पुत्र होता. हे राजा, सुमित्राला युधाजित् नांवाचा पुत्र असून युधाजिताचा शिनी शिनीचा अनमित्र व अनमित्राचा निम्न असे होते ।। १२ ।। निम्नाला सत्राजित आणि प्रसेन असे दोन पुत्र होते. अनमित्राला दुसरा एक शिनि नांवाचा पुत्र असून त्या शिनीला सत्यक हा पुत्र झाला ।। १३ ।। या सत्यकाचा पुत्र युयुधान जय नांवाचा असून युयुधानाला जय आणि जयाला कुणि असे पुत्र होते. कुणीपासून युगंधर जन्मला. अनमित्राला वृष्णि नांवाचा आणखी एक पुत्र होता, त्यास श्वफल्क आणि चित्ररथ असे दोन पुत्र झाले. त्यांतील श्वफल्काला गांदिनीनामक स्त्रीपासून अक्रूर आदिकरून विशेषत: प्रसिद्धीस आलेले बारा पुत्र झाले ।। १४ ।। १५ ।।

त्यांचीं नांवें अक्रूर, आसंग, सारमेय, मृदुर, मृदुविद, गिरि, धर्मवृद्ध, सुकर्मा, क्षेत्रोपेक्ष, अरिमर्दन, शत्रुघ्न, गंधमाद आणि प्रतिबाहु अशीं होतीं. त्यांना सुचीरा नांवाची एक बहीणहि होती. अक्रूरालाहि देववान् आणि उपदेव असे दोन पुत्र होते. वृष्णीच्या चित्ररथ नामक दुसऱ्या मुलाला पृथु, विदूरथ इत्यादि अनेक वृष्णिवंशवर्धक असे पुत्र झाले ॥ १६ ॥ ॥ १७ ॥ १८ ॥ सात्वताचा अंधकनांवाचा जो पुत्र होता त्याला कुकुर, भजमान, शुचि आणि कंबलबर्हिष असे पुत्र होते. त्यांत कुकुराला वह्निनामक पुत्र असून वह्नीला विलोमा या नांवाचा पुत्र होता ॥ १९ ॥ विलोम्याचा पुत्र कपोतरोमा आणि कपोतरोम्याचा अनु, तुंबुरु हा ह्या अनूचा मित्र होय. अनूचा पुत्र अंधक, अंधकाचा दुंदुभि, दुंदुभीचा दरिद्योत आणि दरिद्योताचा पुनर्वसु ॥ २० ॥ पुनर्वसूला आहुक नांवाचा पुत्र आणि आहुकी नांवाची कन्या अशीं अपत्यें होतीं. आहुकाला देवका आणि उग्रसेन असे दोन पुत्र असून देवकाला देववान्, उपदेव, सुदेव आणि देववर्धन असे चार पुत्र होते. शुकाचार्य परीक्षिताला सांगतात.--हे राजा, या चौघांना धृतदेव, आदिकरून सात बहिणी असून त्यांचीं नांवें श्रुतदेवा, शांतिदेवा, उपदेवा, श्रीदेवा, देवरक्षिता, सहदेवा व देवकी अशीं होता. त्या सर्वांशीं वसुदेवानें विवाह केला ॥ २१ ॥ ॥ २२ ॥ २३ ॥ आहुकपुत्र उग्रसेनाला कंस, सुनाभा, न्यग्रोध, कंक, शंकु, सुहू, राष्ट्रपाल, सृष्टि आणि तुष्टिमान असे पुत्र होते. वसुदेवाचे जे देवभाग * आदिकरून धाकटे भाऊ होते त्यांच्या स्त्रिया म्हणजे कंसा, कंसवती, कंका, शूरभू, राष्ट्रपालिका या उग्रसेनाच्याच कन्या होत ॥ २४ ॥ ॥ २५ ॥ चित्ररथाला विदूरथनामक पुत्रापासून शूराचा जन्म झाला. शूराचा पुत्र भजमान. भजमानापासून शिनि झाला. शिनीचा पुत्र स्वयंभोज आणि स्वयंभोजाचा हृदीक म्हणून सांगितला आहे ॥ २६ ॥ हृदिकाला देवबाहु शतधनु व कृतवर्मा हे असे तीन पुत्र होते. याशिवाय देवमीढ नांवाचा आणखी एक पुत्र असून देवमीढाला शूर नांवाचा पुत्र होता. या शूराची पत्नी मारिषा नांवाची होती ॥ २७ ॥ तिच्यापासून शूराला निष्पाप असे दहा पुत्र झाले. त्यांचीं नांवें वसुदेव, देवभाग देवश्रवस, आनक, सृंजय, श्यामक, कंक, शमीक, वत्सक वृक व अशीं होतीं.त्यांपैकीं ज्याच्या जन्माच्या वेळीं आनकनामक ज्या देवांच्या दुंदुभि त्यांचा घोष झाला त्याचें नांव वसुदेव. हाच श्रीहरीचें अवतार घेण्याचें स्थान झाला व त्यालाच आनकदुंदुभि असें म्हणतात. या दहा भावांना पृथा, श्रुतदेवा, श्रुतकीर्ति, श्रुतश्रवा व राजाधिदेवी अशा पांच बहिणी होत्या, ह्या एवढ्याच शूराच्या मुली होत. शूराचा मित्र कुंतिराजा. हा निपुत्रिक असल्यामुळें शूरानें आपली कन्या पृथा त्याला दत्तक दिली ॥ २८ ॥ ॥ २९ ॥ ॥ ३० ॥ ॥ ३१ ॥ या पृथेनें दुर्वासमुनीला संतुष्ट करून त्याच्यापासून देवहूति नामक विद्या संपादन केली. हिच्या योगानें इच्छित वेळीं इष्ट देवाला बोलावितां येत असे. या विद्येच्या सामर्थ्याची परीक्षा पाहावी म्हणून तिनें एकदां पवित्र अशा सूर्यदेवाला बोलाविलें असतां तो तिच्याजवळ येऊन उभा राहिला. त्याला पाहून पृथा चकित झाली

* पुढें श्लोक २८ व २९ पाहा.

व त्याला म्हणाली, ‘ हे देवा, विद्येची परीक्षा पाहाण्यासाठींच केवळ मीं हा प्रयोग केला, तरी तूं या वेळीं जा आणि मला क्षमा कर ! ’ ॥ ३२ ॥ ३३ ॥ पण सूर्यानें उत्तर केलें, ‘ हे सुंदरि, माझें दर्शन व्यर्थ जाणारें नाहीं. यास्तव मी तुझ्या ठिकाणीं पुत्राची स्थापना तर करणारच. तथापि तुझें कौमार्य दूषित होणार नाहीं अशी मी व्यवस्था करितों ॥३४॥ असें बोलून सूर्यानें तिच्या ठायीं गर्भाची स्थापना केली आणि तो स्वर्गांत निघून गेला. तो गेल्यानंतर लगेच पृथेला दुसरा सूर्यच जणुं काय असा तेजस्वी पुत्र झाला ॥ ३५ ॥ पण यामुळें आपल्यावर लोकापवाद येईल या भीतीनें पृथेनें तो नदीच्या पाण्यांत टाकून दिला. शुकाचार्य परीक्षिताला सांगतात, हे राजा, तुझा पणजोबा जो पराक्रमी पंडुराजा त्यानें पुढें या पृथेशीं विवाह केला ॥ ३६ ॥ पृथेची बहीण जी श्रुतदेवा तिच्याशीं करुषाचा पुत्र जो वृद्धशर्मा यानें विवाह केला व त्याला तिच्यापासून दंतवक्त्र नांवाचा मुलगा झाला. हा दन्तवक्त्र म्हणजे पूर्वी सनकादि मुनींच्या शापामुळें हिरण्यकशिपु नांवानें दितीचा पुत्र झालेला जय नांवाचा विष्णूचा द्वारपालच होय ॥ ३७ ॥ पृथेच्या श्रुतकीर्तिनामक बहिणीचें, कैकेयाचा पुत्र जो धृष्टकेतु त्यानें पाणिग्रहण केलें व त्याच्यापासून तिला सन्तर्दन आदिकरून कैकेयसंज्ञक पांच पुत्र झाले ॥ ३८ ॥ पृथेच्या तिसऱ्या राजाधिदेवीनामक बहिणीच्या पोटीं जयसेनापासून दोन पुत्र झाले. ते पुढें अवंति देशाचे राजे झाले. चेदि-देशाचा राजा दमघोष यानें तश्रुवा या पृथेच्या बहिणीशीं विवाह केला ॥ ३९ ॥ शिशुपाल हा ह्या श्रुतश्रवेचा पुत्र होय. याच्याहि जन्माची कथा + पूर्वी सांगितलीच आहे. वसुदेवाचा भाऊ जो देवभाग त्याला कंसानामक स्त्रीपासून चित्रकेतु आणि बृहद्बल असे पुत्र झाले ॥ ४० ॥ त्याच्या देवश्रवा नांवाच्या भावाला कंसवती नांवाच्या स्त्रीच्या पोटीं सुवीर आणि इषुमान् हे पुत्र झाले आणि आनक नांवाच्या भावाला कंकेच्या पोटीं सत्यजित् आणि पुरुजित् असे पुत्र झाले ॥ ४१ ॥ वसुदेवाच्या संजय नांवाच्या भावाला * राष्ट्र-पाली या स्त्रीपासून वृष, दुर्मर्षण इत्यादि पुत्र झाले आणि श्यामक या भावाला शूरभूमि नामक पत्नीपासून हरिकेश आणि हिरण्याक्ष असे दोन पुत्र झाले ॥ ४२ ॥ त्याचप्रमाणें, वसुदेवाचा भाऊ वत्सक त्याला मिश्रकेशीनामक अप्सरेपासून वृक आदिकरून पुत्र झाले व पुढें त्यांपैकीं वृकाला दुर्वाक्षीच्या पोटीं तक्ष, पुष्कर, शाल इत्यादि पुत्र झाले ॥ ४३ ॥ शमीकापासून सुदामिनीला सुमित्र, अर्जुनपाल इत्यादि मुलगे झाले व कंकाला कर्णिका नामक स्त्रीपासून ऋतधाम आणि जय हे पुत्र झाले ॥ ४४ ॥ आनकदुंदुभि म्हणजे वसुदेव, ह्याला देवकी, पौरवी, रोहिणी, भद्रा, मदिरा, रोचना, इला इत्यादि सात स्त्रिया होत्या व त्यांत देवकी ही मुख्य होती ॥ ४५ ॥ त्यांतील रोहिणीपासून वसुदेवाला, कृत, बल, गद, सारण, दुर्मद, विपुल व ध्रुव हे मुलगे झाले ॥ ४६ ॥ भूत, सुभद्र, भद्रवाह, दुर्मद, भद्र इत्यादि बारा पुत्र पौरवीचे होत ॥ ४७ ॥ मदिरेला, नन्द, उपनन्द,

---

+ स्कंध ७ अध्याय १.

* श्लोक पंचवीस यांत सांगितलेल्या राष्ट्रपालिका व शूरभू

कृतक, शूर इत्यादि पुत्र झाले आणि कौशल्या * किंवा भद्रा हिला केशि नांवाच्या कुलाला आनंद देणारा एकच पुत्र झाला ॥ ४८ ॥ वसुदेवाला रोचनानामक पत्नीच्या पोटीं हस्त, हेमांगद इत्यादि पुत्र झाले आणि इलेच्या पोटीं यदु, उरुवल्क आदिकरून पुत्र झाले ॥ ४९ ॥ धृतदेवानामक स्त्रीच्या पोटीं त्याला विपृष्ठ हा एकटाच मुलगा झाला, आणि श्रम, प्रतिश्रुत इत्यादि मुलगे त्याला शान्तिदेवानामक स्त्रीपासून झाले ॥ ५० ॥ कल्पवर्ष आदिकरून दहा राजे हे वसुदेवाचे उपदेवेपासून झालेले पुत्र असून वसु, हंस, सुवंश इत्यादि सहा त्याच्या श्रीदेवेच्या पोटीं झालेले मुलगे होत ॥५१॥ देवरक्षितेला त्याच्यापासून गद आदिकरून नऊ मुलगे झाले. सहदेवेला वसुदेवापासून झालेले आठ पुत्र असून त्यांचीं नांवें पुरु, विश्रुत इत्यादि होतीं. जसे धर्माचे आठ वसु तसेच हे वसुदेवाचे आठ पुत्र होते. उदारबुद्धीच्या वसुदेवाला देवकीपासूनहि आठ पुत्र झाले ॥ ५२ ॥ ५३ ॥ त्यांतील सातांचीं नांवें कीर्तिमान्, सुषेण, भद्रसेन, ऋजु, संमर्दन, भद्र, संकर्षण अशीं होतीं. संकर्षण हा शेषाचा अवतार होता ॥ ५४ ॥ वसुदेव व देवकी यांचा आठवा पुत्र स्वतः श्रीहरीच खरोखर होय. शुकाचार्य परीक्षिताला सांगतात, हे राजा, तुझी आजी जी भाग्यशाली सुभद्रा, ती त्यांचीच कन्या होय ॥ ५५ ॥ जेव्हां जेव्हां म्हणून या पृथ्वीवर धर्माचा क्षय होतो आणि पापाची वृद्धि होते, तेव्हां तेव्हां भगवान् सर्वसमर्थ श्रीहरि स्वतः अवतार घेतो ॥ ५६ ॥ राजा, त्या श्रीहरीला जन्म घेण्यास किंवा कर्म करण्यास मायेशिवाय दुसरें कारण संभवत नाहीं. तो परमात्मा सर्वसाक्षी व सर्वसमर्थ असल्यामुळें स्वतःच्या इच्छेशिवाय म्हणजे त्याला कसलीच अपेक्षा नसते ॥ ५७ ॥ त्याच्या मायेचा खेळ हाच मनुष्याच्या जन्माचें, संसाराचें व लयाचें कारण असून, त्याची कृपा हीच त्या जन्ममरणाची निवृत्ति करून आत्मस्वरूपाची प्राप्ति करून देण्यासाठीं आवश्यक असते ॥५८॥ कोट्यवधि सैन्याचे अधिपति अशा राजचिन्हें धारण करणाऱ्या दैत्यांनीं पृथ्वी पादाक्रांत करून टाकिली असतां तिचा भार नाहींसा करण्यासाठीं त्यानें हा अवताराचा उद्योग केला ॥ ५९ ॥ भगवान् मधुसूदनानें शेषासह अवतार घेऊन जीं मोठीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं, त्याचें मोठमोठ्या देवांना मनानेंहि आकलन होणें शक्य नाहीं ॥ ६० ॥ कलियुगामध्यें जन्मास येणारे जे भक्त आहेत, त्यांचें दुःख, उद्वेग व अज्ञान हीं नष्ट करून त्यांच्यावर कृपा करावी म्हणून त्या भगवंतानें अत्यंत पुण्यकारक असें यशस्वी चरित्र करून दाखविलें ॥ ६१ ॥ त्यांचें तें यशस्वी चरित्र सज्जनांच्या कानाला अमृताप्रमाणें मधुर लागतें आणि सर्व पवित्र वस्तूंमध्यें तें श्रेष्ठ आहे. एकदां का तें कानांच्या द्वारा प्राशन केलें म्हणजे कर्मासंबंधींच्या सर्व वासनाच मनांतून धुऊन जातात ॥ ६२ ॥ भोज, वृष्णि, अंधक, मधु, शूरसेन, दशार्ह, कुरु, सृंजय, पांडु या सर्व राजांना त्या भगवंताचें चरित्र

* कोशल्या हें भद्रेचेंच नांव होय. भद्रा म्हणजे कल्याणप्रद आणि कोशल्या म्हणजेहि कल्याणप्रद. यावरून दोन्ही नांवें एका अर्थानें घातलीं आहेत. संस्कृतांत अशीं विशेषनामांतहि अर्थावरून रूपान्तरें करण्याची वहिवाट आहे. दुसरें उदाहरण दशरथ आणि दिक्स्यंदन

नित्य स्तुत्य वाटत असे ॥ ६३ ॥ त्याचें शरीर अवयवांनीं मोहक असून प्रेमानें केलेलें हास्ययुक्त अवलोकन, गोड व उदार भाषण आणि नानाविध पराक्रमांचे खेळ यांच्या योगानें त्यानें या मनुष्यलोकाच्या मनाला मोठा आनंद दिला ॥ ६४ ॥ त्याच्या कानांत मकराकार कुंडलें असून त्यामुळें ते फार रमणीय दिसत. त्यांच्या तेजानें तळपणाऱ्या गालांवर खेळकर हास्य विलसत असल्यामुळें त्याचें मुख अत्यंत मनोहर दिसे. अशा मुखाचें दर्शन हाच सर्वांचा नित्याचा उत्सव होता. त्याच्याकडे टक लावून कितीहि पाहिलें तरी कोणाहि स्त्रीपुरुषांची तृप्तिच होत नसे व बघतां बघतां पापण्या हालून त्याच्या दर्शनांत खंड पडल्यास त्यांना त्याच्याच मोठा राग येई ॥ ६५ ॥ तो जन्मास येतांच आपल्या पित्याच्या घराहून गोकुळांत गेला. पुढें शत्रूंचा वध करून त्यानें अनेक स्त्रियांशीं विवाह केले आणि त्यांच्यापासून त्याला शेंकडों पुत्रहि झाले. अशा रीतीनें आपला उद्देश सिद्धीस नेल्यावर त्या भगवंतानें अनेक यज्ञ करून आपली आपणच पूजा केली आणि लोकांमध्यें अध्यात्मशास्त्राचा प्रसार केला ॥ ६६ ॥ त्यानें पृथ्वीला झालेला मोठा भार दूर केला, कौरवकुळांत आपसांत उत्पन्न झालेल्या वैरामुळें जें युद्ध झालें त्यांत अनेक राजांच्या सेना केवळ दृष्टिपातानेंच नष्ट करून, त्या युद्धांत त्यानें अर्जुनाला जय मिळवून दिला व शेवटीं उद्धवाला श्रेष्ठ ज्ञानाचा उपदेश करून तो परमात्मा निजधामास गेला ॥ ६७ ॥

**चोविसावा अध्याय समाप्त**

---

**नववा स्कंध समाप्त**

---

# परिशिष्ट १ लें

## सूर्यवंश आणि चंद्रवंश

या वंशवृक्षांत सर्व शाखा विस्तारभयास्तव दिल्या नाहींत; मुख्य मात्र सर्व दिल्या आहेत. मूळ पुरुषापासून क्रमांक घालून ते क्रमांक शाखांतहि त्याच क्रमानें घेतले आहेत. त्याच्या योगानें समकालीन म्हटल्या गेलेल्या पिढ्यांमध्यें किती अंकांचा फरक पडतो हें सहज लक्षांत येईल. कांहीं शाखांच्या शेवटीं स्पष्टीकरणहि जोडलें आहे. राम, जनक, पांडव, कौरव, कृष्ण, अक्रूर, जरासंध इत्यादिकांच्या भागवतमतीय परंपरा यावरून चटकन् लक्षांत येतील व पुराणांतील हीं वर्णनें कालदृष्ट्या कितपत विश्वसनीय आहेत यांचाहि निर्णय करण्यास आपल्यापुरतें साधन होईल.

( १ )

### सूर्यचंद्रवंशांची सांखळी

**भगवान् विष्णु**




**पुरूरवा** [ चंद्रवंशाचा मूळ पुरुष ]

( २ )

**श्राद्धदेव ( वैवस्वत मनु )** [ सूर्यवंशाचा मूळ पुरुष ]



# परिशिष्ट २ रें

( ३ )

## सूर्यवंशाचा मुख्य वृक्ष






| | |
|---|---|
| दृढाश्व | ३० हारित |
| । | । |
| हर्यश्व | चंप |
| । | । |
| निकुंभ | सुदेव |
| । | । |
| बर्हणाश्व | विजय |
| । | । |
| कृशाश्व | भरुक |
| । | । |
| सेनजित् | वृक |
| । | । |
| युवनाश्व | बाहुक |
| । | । |
| **२० मांधाता** (त्रसद्दस्यु) | **३७ सगर** |



# परिशिष्ट २—सूर्यवंशाचा मुख्य वृक्ष ( चालू )

३७ सगर
|
असमंजस
|
अंशुमान्
|
४० दिलीप
|
४१ भगीरथ
|
श्रुत — नाभ
|
सिंधुद्वीप
|
अयुतायु
ऋतुपर्ण
|
सर्वकाम
|
सुदास
|
सौदास (कल्माषपाद)
|
अश्मक
|
५० नारीकवच (मूलक)
|
दशरथ
|
ऐडविड
|
विश्वसह
|
खट्वांग
|
दीर्घबाहु
|
रघु

५९ राम
|
लव — ६० कुश
|
अतिथि
|
निषध
|
नभ
|
पुंडरीक
|
क्षेमधन्वा
|
देवानीक
अनीह
|
वारियात्र
|
बल
|
७० स्थल
|
वज्रनाभ
|
खगण
|
विधृति
|
हिरण्यनाभ
|
पुष्य
|
ध्रुवसंधि
|
सुदर्शन
|
७८ अग्निवर्ण

८० मरु
|
प्रश्रुत
|
८२ संधि
|
अमर्षण
|
महस्वान्
|
विश्वसाव्ह
|
प्रसेनजित्
|
तक्षक
|
८८ बृहद्बल*
बृहद्रण
|
९० उरुक्रिय
|
वत्सवृद्ध
|
प्रतिव्योम
|
भानु
|
दिवाक
|
सहदेव
|
बृहदश्व
|
भानुमान्
|
प्रतीकाश्व
|
सुप्रतीक
|
१०० मरुदेव

१०३ अंतरिक्ष
|
सुतपा
|
अमित्रजित
|
बृहद्राज
|
बर्हि
|
कृतंजय
|
रणंजय
|
११० संजय
|
शाक्य
शुद्धोद
|
लांगल
|
प्रसेनजित्
|
क्षुद्रक
|
रणक
|
सुरथ
|
११८ सुमित्र
|
( समाप्त )

---

*पांडवांचा समकालीन 'बृहद्बल' हा कौरवांच्या बाजूनें युद्ध करीत होता व अभिमन्यूच्या हातून मरण पावला.




असे मनूपासून सुमित्रापर्यंत ११८ पुरुष होतात. मनूपासून रामापर्यंत ५९ पुरुष होत असल्यामुळें राम हा अगदीं मध्यावर येतो. रामानंतरच्या ५९ पुरुषांपैकीं बृह-द्बलापासून पुढले ३० कलियुगांतील होत.

# परिशिष्ट ३ रें

## चंद्रवंशाचा वृक्ष

### (४) पुरूरव्याची संतति

१ पुरूरवा




## (५) पुरूचा वंश

